
ऋषीसमुदाय नासिके
ताचे दर्शनास नि.
नासिकेत.

अध्याय १



## अध्याय १




यमदूतपाप्यांस लोखंडी

# अध्याय १२



अध्याय १२



## अध्याय ३६




पुण्यवानलोकभोजनासबसलेआ·

श्रीगजानन प्रसन्न.

# नासिकेत--कथासार.



## अध्याय १ ला

## ( उद्दालक ऋषीचें चरित्र व त्यास ब्रह्मदेवाचा वर प्राप्त होतो. )

पूर्वी पांडववंशांतील ' जनमेजय ' नांवाचा राजा हस्तिनापुरीं राज्य करीत असतां, त्याची कीर्ति फार पसरली होती कारण, तो राजा धर्मात्मा असून प्रजेचें पालन उत्तम प्रकारें करीत असे. त्यामुळें त्याच्या राज्यांत सर्व लोक सुखी असत. तो राजा दानजय, पुण्यजय व अंगीं परमजय असा होता, ह्मणून ऋषि त्याला ' जनमेजय ' ह्मणत.

एके दिवशीं राजा आपल्या सभेंत बसला असतां, ' श्रीवेदव्यास ' यांचा शिष्य जो वैशंपायन ऋषि तो तेथें आला. त्याला पाहून राजानें सिंहासनावरून उठून साष्टांग नमस्कार केला व त्यांची षोडशोपचारें पूजा केली आणि हात जोडून विनंति केली कीं, महाराज ! आज आपल्या दर्शनाचा लाभ झाल्यानें मी मोठा कृतार्थ झालों. तरी आपण मजवर प्रसन्न होऊन एखादी पुण्यपावन कथा सांगावी.

राजाचा असा आदर पाहून वैशंपायनानें पुण्यपावन व पवित्र अशी कथा सांगण्यास आरंभ केला. तीच कथा ह्या गोष्टींत सांगतों. प्राचीनकाळीं ब्रह्मदेवाचा मानसपुत्र जो 'उद्दालक ऋषि' तो तपानें व ब्रह्मचर्यानें मोठा विख्यात होता. तो वेदशास्त्रांत पारंगत असून दाता व दयाळु असा असे. त्याचा आश्रमही मनोहर असे. आश्रमीं मोठमोठे वृक्ष सरळ व सारखे उंच गेलेले, जागजागीं लतामंडप व पुष्पवाटिकांचा सुगंध सुटलेला, कोकिळा, मयूर, शुक, सारिका यांचा मधुर शब्द, हंसपक्षी क्रीडा करीत असून फलपुष्पांनीं तरुवर डवडवलेले, असा तो विश्रांतिकारक आश्रम होता, त्या आश्रमांत एके दिवशीं कांहीं ऋषिमंडळी आली. त्यांचीं नांवें येणेंप्रमाणें:–गौतम, भरद्वाज, भुशुंडी, अंगिरा, रोमहर्षण, मार्कंडी, पिप्पलायनादि ऋषिमंडळ उद्दालकाची कीर्ति ऐकून त्याच्या भेटीस आले. त्यांना पाहून 'उद्दालकानें' मोठ्या आवडीनें त्यांचें पूजन केलें व विनंति केली कीं, आज माझा जन्म, माझें तप, माझें व्रत व माझें दान हीं सर्व तुमच्या दर्शनानें सफल झालीं. आतां तुमचे मनांत काय हेतु असेल तो, निवेदन करावा.

त्यावेळीं तापसांमध्यें मुकुटमणि असा जो 'पिप्पलायन ऋषि' तो बोलूं लागला कीं, आम्हीं तुझ्या तपाची ख्याति ऐकून तुझी स्थिति पहावयास आलों तुझें हें अगाध तप

पाहून ब्रह्मादिक विस्मित झाले; तरी हे ऋषिवर्या ! तूं लग्न न केल्यामुळें हें सर्व व्यर्थ होय. कारण, गृहस्थाश्रमावांचून गति नाहीं. वेदांत गृहस्थाश्रम परम पावन मानिला आहे. ज्याला वित्त, सुत आणि कांता आहेत त्याला सर्व धर्माचें श्रेय आहे. पहा ! अत्रि, अगस्ति हे गृहस्थाश्रमी होते; आणि त्यांच्या स्त्रिया महान् पतिव्रता होत्या. हें तूं जाणतोस? ज्या 'अनुसूयेनें' प्रत्यक्ष त्रैमूर्ति बाळें केलीं आणि त्यांच्या स्त्रिया तिचे घरीं आपले नवऱ्यांची भिक्षा मागावयास आल्या. कश्यपास तेरा स्त्रिया होत्या व सर्व सृष्टि कश्यपापासून झाली. ज्याला संसाराचे ठायीं पुत्रसंतति आहे तोच गृहस्थाश्रमी ब्रह्मचारी. स्वर्गी त्यासच मान मिळतो आणि सर्व पितरांवर त्याचाच मोठा उपकार होतो. संततीवांचून वंश नष्ट होऊन त्याला सर्व त्रैलोक्य शून्यवत् होतें. पुत्रावांचून या लोकीं आणि परलोकीं गति नाहीं. यासाठीं तूं गृहस्थाश्रम कर; नाहीं तर देव, पितर आणि अग्नि हे तुझी निंदा करतील.

याप्रमाणें भाषण ऐकून 'उद्दालकास' हसूं आलें आणि तो ह्मणाला कीं, महाराज ! पुत्र, दारा, धन हीं तपास मोठीं बंधनें होत. यांचेपासून तपास विघ्न होतें. कनक आणि कांता हा ब्रह्मदेवानें मोह निर्माण केला आहे. संसाराचा त्याग करणें हीच खरी तपःस्थिति. करितां मला या गोष्टीची चाड नाहीं.

'पिप्पलायन' ह्मणाला—तूं हें अप्रमाण बोलतोस. अरे, संततीवांचून पुण्य जोडावयाचें नाहीं. या जगांत संतति, दारा आणि धन ही परंपरा चालत आलेली आहे आणि निपुत्रिकास गति नाहीं असें श्रुतीचें वचन आहे. देव, पितर अग्नि हे संततीवांचून तृप्त होत नाहींत आणि जो ब्रह्मचारी तो या जगांत अभागी जाणावा याप्रमाणें ऋषि बोलून ते सर्व निघून गेले.

नंतर 'उद्दालकास' मोठी चिंता उत्पन्न होऊन त्यास कांहीं सुचेनासें झालें, व तेणेंकरून तपास व्यत्यय आला; आणि रात्रंदिवस स्त्रीचिंता प्राप्त झाली. त्याला स्नानसंध्या कांहीं सूचेना आणि तो मनांत विचार करूं लागला कीं, आतां मला आपली कन्या कोण देईल आणि मी गृहस्थाश्रमी कसा होईन. याप्रमाणें चिंतेंत असतां अशी युक्ति सुचली कीं, आपण सत्यलोकीं जावें.

असा विचार करून तपःसामर्थ्याच्या बळानें तो अंतर्गतीनें तावडतोब ब्रह्मसभेंत प्राप्त झाला. जेथें सर्व लोक सत्य बोलतात आणि सत्यानें चालतात; तसेंच सत्यानें देवघेव करतात; ज्यांची सत्यस्थिति आणि सत्यानें परमेश्वर पावन होतो. त्यासच सत्यलोक ह्मणतात.

रत्नखचित सिंहासनावर 'ब्रह्मदेव' आपल्या दिव्यतेजानें विराजमान होऊन संपूर्ण शोभा शोभत आहे; देव,

दानव, यक्ष, किन्नर, ऋषि, गंधर्व, विद्याधर वगैरे हात जोडून नाना स्तोत्रांनीं जयजयकार करीत आहेत. त्या महामंडपांमध्य 'उद्दालकानें' येऊन साष्टांग दंडवत् घातला आणि षोडशोपचारें' पूजा करून हात जोडून आनंदानें स्तोत्र करूं लागला. तेणेंकरून चतुराननास संतोष झाला आणि विचारूं लागला कीं, हे ऋषिसत्तमा! तूं आपल्या आश्रमीं निर्विघ्न आहेसना? तुमची बहुत दिवसांनीं भेट झाली तरी मनामध्यें काय अपेक्षा आहे?

तेव्हां ऋषि हात जोडून मधुर, मृदु आणि मंजुळवाणीनें बोलूं लागला कीं, हे ताता! मी आपल्या आश्रमीं असतां 'पिप्पलायनादि' ऋषि येऊन त्यांनीं मला असें सांगितलें कीं, तूं भार्या कर. कारण, पुत्रावांचून वंश निष्फळ. पितृदेवता उदास आणि तप केल्याचें पुण्य प्राप्त होत नाहीं. असें सांगून ते निघून गेले. तेणेंकरून मनामध्यें अनिवार चिंता उत्पन्न होऊन तपास विघ्न झालें. स्नान, संध्या, तर्पण वगैरे करतानां मी अहर्निशीं चिंतेनें ग्रस्त झालों आहे तरी याला कांहीं उपाय कराल म्हणून शरण आलों आहे.

याप्रमाणें पुत्राचें भाषण श्रवण करून 'ब्रह्मदेवानें' त्यास असा वर दिला कीं, हे ऋषिवर्या! प्रथम पुत्र आणि नंतर भार्या तुजप्रत प्राप्त होईल तुझ्या पुत्राच्या चरित्रश्रवणानें त्रैलोक्य उद्धरेल. तुला इक्ष्वाकुकुळांतील सुंदर पत्नी प्राप्त होईल, हें सत्य जाण.

तेव्हां ' उद्दालक ' ह्मणाला, महाराज ! असें कोणीं देखिलें नाहीं व ऐकिलेंही नाहीं ! हें कसें घडेल ? ब्रह्मदेव ह्मणाला, माझें वाक्य कधींही अन्यथा होणारें नाहीं. माझ्या वचनावर विश्वास ठेवून आनंदानें परमेश्वराचें अर्चन करीत जा आणि आपल्या आश्रमीं सुखानें रहा. नंतर ' उद्दालकानें ' साष्टांग प्रणिपात करून ब्रह्मदेवाची आज्ञा घेऊन तो आनंदानें स्वाश्रमीं परत आला.

---

# अध्याय २ रा

## ( उद्दालकास कामानें पीडिलें व रघुराजा चंद्रप्रभेचा त्याग करितो )

नंतर असें झालें कीं, उद्दालकाची चित्तवृत्ति अस्थिर होऊन त्याच्या मनांत नाना विचार व आशंका येऊं लागली. कारण, स्त्रीवांचून पुत्र जन्मला असें कोणी ऐकिलेंही नाहीं, तर हें ब्रह्मदेवानें खोटें सांगितलें असावें.

एके दिवशीं असा चमत्कार झाला कीं 'उद्दालक' सावधान स्थितीनें स्नान, संध्या, तर्पण, जप, होम, अनुष्ठान व ईश्वर-आराधन करीत असतां, पुत्रइच्छेनें विव्हळ झाला आणि त्याचे ध्यानीं–मनीं स्त्री दिसूं लागली. याप्रमाणें त्याची देह-स्मृति नष्ट होऊन तो विरहानलानें विकळ होऊन तत्काळ त्याचा वीर्यस्राव झाला.

एक वेळ पुरुष कामातुर झाला ह्मणजे त्याची चित्तवृत्ति भ्रष्ट होते आणि तो हित-अहित कांहीं जाणत नसतो. या कामानें देवादिकांस सुद्धां घोळिलें; बहुत तापसानां नागविलें; ' जपी, तपी, मुंडी आणि कामें मारिलें त्यांच्या तोंडीं ' हें साधुवाक्य सत्य होय. हा काम मोठा बलवान् आहे. तो एक वेळ खवळला ह्मणजे ब्रह्मादिकानांही आवरत नाहीं.

असो, कांहीं वेळानें ' उद्दालक ' सावध स्थितींत येऊन पहातो तों वीर्य क्षितिवर पडलें आहे; तेव्हां त्यानें तें कमलांत घालून दर्भानें बांधून गंगेंत सोडून दिलें आणि आपण स्नान करून आश्रमीं आला.

जनमेजय राजानें वैशंपायनास विनंति केली कीं, महाराज, प्रथम पुत्रलाभ व नंतर स्त्रीलाभ असें ' कधीं देखिलें ना ऐकिलें ' ही पवित्र कथा ऐकण्यास मी फार आतुर झालों आहें; असें ऐकून वैशंपायन सांगूं लागला:-मोक्षपुरीं-मध्यें जी प्रथम, अशी पुण्यपावन अयोध्यानगरी तीमध्यें सूर्यवंशांतील रघुराजा राज्य करीत होता. तो धर्मात्मा असून गोब्राह्मणप्रतिपालक, स्वधर्मशील, शुद्धसात्विक आणि परस्त्रीविषयीं नपुंसक, अलौलिक पुरुषार्थी, उदार आणि यशस्वी असा असे. त्याची कन्या ' चंद्रप्रभा ' नामें रूपसंपन्न लावण्यखाणी असून तिचे कमलासारखे नेत्र, विशाळ भ्रुकुटी, घनस्तनी, चारुभाषिणी अशी अत्यंत सुंदर असे.

तिनें पीतांबर परिधान केलेला व नानारत्न अलंकारांनीं युक्त जशी–लक्ष्मी, सावित्री, पार्वती, रंभा, उर्वशी, तिलोत्तमा, नागिणी यांप्रमाणें जिचें सौंदर्य, केवळ ती मदनाची पुतळीच स्वर्ग, मृत्यु, पाताळामध्यें तिच्या सौंदर्यास उपमा नाहीं. तिनें नित्य दहासहस्र राजकन्या व पुष्कळ सख्या बरोबर घेऊन गंगेवर यावें आणि जलक्रीडा, स्नान करून पुष्कळ ब्राह्मणांस सन्मानानें दानें करावीं.

असो अयोध्यानगर मोठें शोभायमान असून त्याचें पालन रघुराजा करीत असतां, त्या पुरीमध्यें कोणास दुःख आणि दारिद्य ह्मणून माहीत नव्हतें. तो राजा परम सत्यव्रती, प्रजापालनीं दक्ष, धीरवीर आणि उदार असल्यामुळें त्याची प्रजा फार सुखी असे. त्याच्या राज्यांत सकल राष्ट्रें स्वस्तिक्षेम असत. सर्व लोक चिरायु असून कोणास गदवार्धक्य नाहीं. तसेंच घरोघरीं हरिकीर्तनें, वेदाध्ययनें, अग्निहोत्रें असून गाई नेहमीं दुभत्या आणि वृक्षवेली सदां फलपुष्पांनीं शोभायमान असावयाच्या. ब्राह्मण सदाचारी आणि संतुष्ट असून राजाचें अभीष्ट चिंतन करीत. सर्व प्रजा भगवद्भक्तिपरायण आणि सर्वदा सुखसंपन्न असे. असें तें मोक्षपुर 'अयोध्यानगर' प्रथम 'हरिश्चंद्रानें' वैकुंठास नेलें. दुसरे वेळीं 'रुक्मांगद राजानें' आणि तिसरे वेळीं 'श्रीरामचंद्रानें' सहपरिवारें वैकुंठास नेलें.

हे जनमेजयराजा ! आणखी चौथ्यानें ' अयोध्या ' वैकुंठास जाणार असें शास्त्रमत आहे. ह्या ' अयोध्यापुरीचें ' वर्णन पुष्कळ आहे परंतु विस्तारभयास्तव सोडून देतों.

एके दिवशीं जी पद्माक्षी पद्मवदना सुंदर अशी राजकन्या ' चंद्रप्रभा ' तिनें देवांगना, राजकन्या आणि शेकडों दासी बरोबर घेऊन ती नित्याप्रमाणें जलक्रीडेकरितां निघाली. त्यावेळीं तिचे मस्तकावर श्वेतवर्ण छत्रचामरांचा भार शोभा देत होता. नानाप्रकारच्या वाद्यांचा नाद दुमदुमून गेला होता. गंधर्वांच्या कन्या हातामध्यें विणे घेऊन सप्तस्वरीं रागोद्धार करूं लागल्या व कित्येक नाचूं लागल्या. अशा गजरानें व मोठ्या आनंदानें ती सकलसौभाग्यसुंदरी शरयूतीरीं प्राप्त झाली असतां, सकल स्त्रिया आनंदानें जलक्रीडा करूं लागल्या. ब्राह्मणांस सुवर्णदानें दिलीं. तसेंच ' चंद्रप्रभेनें ' स्नान करून दिव्य पीतांबर परिधान केला व ब्राह्मणांस सुवर्णदान दिलें आणि आपण शरयूची मजा पहात तिच्या तीरीं बसली.

त्यावेळीं असा चमत्कार झाला का, नदीमध्यें वाहात आलेलें सुवर्णकमल अकस्मात् राजकन्येच्या दृष्टीस पडलें आणि त्याची दिव्य शोभा पाहून ' चंद्रप्रभेस ' मोठा हर्ष झाला व आपल्या सखीजनांस दाखवूं लागली. तों तें कमल वहात वहात नजीक आलें तेव्हां त्याचा सर्वांस मोह उत्पन्न हो-

ऊन तें आणण्यासाठीं राजकन्येनें परिचारिकेस सांगितलें. दासीनें मोठ्या त्वरेनें जाऊन तें सुवर्णकमल आणून आपल्या स्वामिणीचे हातीं दिलें.

'चंद्रप्रभा' मोठ्या प्रीतीनें त्या कमलास पाहूं लागली तों तें दर्भानें बांधलेलें दृष्टीस पडलें, तिनें ती दर्भग्रंथि सोडून मोठ्या आवडीनें त्याचें अवघ्राण केलें. त्यावेळी त्यांतील रेतकण उसळून तिच्या नाकावाटे पोटांत गेला. त्या कमलामध्ये 'उद्दालकऋषीचें' रेत होतें. तें राजकन्येस माहीत नसून तिनें त्याचा आमोद घेण्याकरितां हुंगिलें तों तें नासिकाद्वारें उसळून नाभिकमलीं आलें. तेव्हां 'चन्द्रप्रभा' पुनः स्नान करून आपल्या गृहाप्रत आली.

असा अपूर्व प्रकार घडल्यामुळें. राजकन्येस गर्भसंभव झाला. मग तिला अहोरात्र चैन पडेना. याप्रमाणें एक मास पूर्ण होतांच तिच्या उदरीं जडता प्राप्त झाली. उठतां बसतां श्वास लागूं लागला; या प्रकारचीं चिन्हें घडतांच 'चन्द्रप्रभेस' मोठी चिंता प्राप्त झाली. दुसरे मासीं तिच्या सर्वांगावर गर्भचिन्हें दिसूं लागलीं. तिसरे मासी घनस्तन वगैरे प्रकार घडून आला; त्यामुळें गर्भलक्षणांनीं मंडित झाली. चवथे व पांचवे मासीं नाभि स्थूल होऊन गर्भतेजें सोज्वळ दिसूं लागली.

याप्रमाणें सहावा मास प्राप्त झाला असतां तिच्या मातो-

श्रीनें पाहिलें तों ती सर्व चिन्हांनीं युक्त दिसली. त्यावेळीं राणी आपलें अंग भूमीवर टाकून मूर्च्छित झाली. तें पाहून ' चन्द्रप्रभेस ' मोठें भय वाटलें आणि ती परमेश्वराचा धांवा करूं लागली. कांहीं वेळानें राणी सावध झाली आणि ह्मणाली, तूं हें निंद्यकर्म करून पवित्र सूर्यवंशास डाग लाविलास. याप्रमाणें ती अपार शोक करूं लागली आणि ह्मणाली हे ' चन्द्रप्रभे ! ' तुला वरण्यासाठीं त्रैलोक्यांतील भूपाळ कसे उद्युक्त आहेत असें असतां तूं आमचें कुळशिळ बुडविलेंस. तूं दोन्ही कुळें नरकांत लोटण्यास माझ्या पोटीं वैरिणी झालीस; असें ह्मणून ती धरणीवर दुःखानें गडबडां लोळूं लागली. राणीचे केश मोकळे सुटले. डोळ्यांतून अश्रुधारा वाहूं लागल्या. याप्रमाणें तिला संताप झाला.

तेव्हां ' चन्द्रप्रभा ' ह्मणाली हे माते ! तूं अंमळ स्वस्थ हो आणि मी सांगतें तो समूळ वृत्तांत ऐकून घे. माझें कर्म बलवत्तर त्याला इलाज नाहीं. मी परपुरुष स्वप्नांत सुद्धां पाहिला नाहीं; परंतु माझ्या दैवगतीनें एक विपरीत करणी झाली, ती मी तुला सांगतें ऐक.

एके दिवशीं मी गंगेवर स्नानाकरितां गेलें असतां, त्यावेळीं एक कमळ वहात आलें. त्याचा रंग फार मोहक होता, ह्मणून मी तें दासीस आणावयास सांगितलें, तेव्हां दासीनें जाऊन त्वरित आणून तें माझे हातीं दिलें आणि मी पहातें

तें त्यास दर्भ बांधला होता. तो दर्भ सोडून त्याचा वास घेण्याकरितां नाकास लाविलें. त्यांतून श्वासाबरोबर नाकावाटे उदरांत काय गेलें तें मी समजत नाहीं. पुरुषाचा अंगसंग कसा तो मला मुळींच माहीत नसून हा माझा कर्मभोग ओढवला, आतां मी आपला प्राणत्याग करितें. तूं व्यर्थ खेद कशाला करतेस ? माझ्या नशिबीं असें लिहिलें होतें तें कस चुकेल ? त्याला आतां मी काय करूं ? माझ्या बापाचा वंश फार पवित्र असून त्याची त्रैलोक्यांत मोठी ख्याति आहे आणि मी त्याचे पोटीं जन्मास येऊन त्यास कलंक लाविला, आतां मला हें जग आणि हा प्राण नकोसा झाला. मेल्या ब्रह्मदेवा ! हें काय तूं माझ्या प्रारब्धीं लिहिलेंस ? असा माझेकडून काय दोष घडला ह्मणून हा कर्मभोग ओढवला; आतां मी कसें शांतवन करूं, राजाला हें तोंड कसें दाखवूं जगांत ही केवढी अपकीर्ति झाली. परमेश्वरा ! पूर्वजन्मीं असें काय अघोर पाप केलें आणि कशी मला काळवेळ प्राप्त झाली कीं, तें कमल वहात येऊन त्याचें मी अवघ्राण केलें. माझे हातून गोहत्या झाली किंवा ब्राह्मणाचा घात झाला ! किंवा अतीतास विन्मुख लाविलें ह्मणून मला हें दुःख प्राप्त झालें. माझ्या सारखी पापिणी या त्रैलोक्यांत दुसरी कोणी नसेल ! प्राणत्याग करावा तर गर्भपाताचें पाप लागतें. आतां मला हा देह ठेवून कांहीं सौख्य नाहीं. याप्रमाणें ती राजकन्या दुःख करूं लागली

वाचकहो ! ‘ चंद्रप्रभा ’ दुःखानं विव्हळ होऊन तिला कांहीं सुचेना; तिच्या मनांत प्राणत्याग करावा असा विचार येऊं लागला, पण ती सर्वज्ञ असल्यामुळें पुनः मनाशीं विचार करी कीं, मी पूर्वजन्मीं काय पाप केलें ह्मणून या जन्मीं मला असें लांछन लागून मजवर दुःखाचा पर्वत कोसळला व आतां आत्महत्या व गर्भहत्या करून हें पाप कोठें फेडूं ? यावेळेस परमेश्वर मला मरण देईल तर फार बरें होईल. या प्रकारें ती आक्रंदून दुःख करूं लागली; तों तेथें राजा आला आणि कन्या गरोदर पाहून भूमीवर मूर्च्छित पडला.

पुनः राजा सावध होऊन सद्गदित कंठानें कन्येस विचारूं लागला कीं, हें दुष्कृत तूं [illegible]सें आचरलीस तो सर्व वृत्तांत मला सांग. तूं हें निंद्यकर्म क[illegible] सूर्यवंशास लांछन लाविलेंस आणि माझ्या तोंडास काळिमा आणिलास. आतां मी काय करूं आणि कोठें जाऊं ? नशिबानें तूं आमचे पोटीं निर्माण होऊन सर्व कुळ नरकांत बुडविलेंस; असें बोलतां बोलतां राजा पुनः मूर्च्छित होऊन प्राण त्यागूं लागला त्याला तें दुःख सहन होईना.

वाचकहो ! त्यावेळीं ‘ चद्रप्रभेची ’ काय स्थिति झाली असेल त्याचा विचार तुह्मींच करा. ती ह्मणाली, हे ताता ! तुह्मीं व्यर्थ प्राणत्याग कां करितां ! मी तुमची कन्या निर्लांच्छनी असून माझी कर्मगति मला कळेना. मी सत्य सांगतें

कीं माझे हातून दुष्कर्म असें कांही घडलें नाहीं. याला चंद्र, सूर्य आणि धरणी हे साक्षी आहेत. माझ्या कर्मानें वेढिलें त्याला माझा उपाय नाही. हें सत्य जाणा. 'चंद्रप्रभा' सर्वांगानें रोमांचित होऊन थरथरां कांपूं लागली आणि ह्मणाली, माझा खराखरा वृत्तांत असा आहे कीं. पूर्वी मी गंगेवर स्नानासाठी गेलें असतां. अकस्मात् एक कमळ वाहात आलें. त्यास दर्भ बांधिला होता. तें दासीस आणावयास सांगितलें. दासीनें आणून तें माझें हातीं दिलें. मी तो दर्भ सोडून त्याचा परिमळ अवघ्राणिला. त्याबरोबर माझे हातून कांहीं अधर्म झाला नाहीं. हें मी सत्यप्रतिज्ञेनें सांगतें आणि तुह्मी सांगाल तें दिव्य करीन मी तर निष्पाप आणि निर्भय आहें, परंतु दैवगति विचित्र, तिला मी काय करूं; हे धरणीमाते ! तुझीच साक्षी असें ह्मणून ती धायधाय रडूं लागली.

याप्रमाणें शोकाकुलित होऊन राजास पुनः पुनः विनवूं लागली कीं, हे ताता ! ही तुमची कन्या निर्लांच्छनी असून सर्व प्रकारें निर्दोषी आहे, हें माझें वचन सत्य माना. माझ्या प्राक्तनकर्माचा ठेवा तो मला अवश्य भोगावयास लागला; तरी आतां आपल्या हातानें या देहाचा घात करावा, एवढेंच माझें मागणें आहे.

त्यावेळीं राजकन्या 'चन्द्रप्रभा' अति शोक करूं लागली, परंतु तिच्या बापास तिनें सांगितलेला वृत्तांत खरा न

वाटून त्यास अतिशय कोप आला आणि तो ह्मणाला,हें अघटित काय सांगतेस ? अगे मी सूर्यवंशीं नृपति असून माझी कीर्ति त्रैलोक्यांत मावत नाहीं आणि तूं अशी गुणवती कन्या ह्मणून सर्व लोक तुझें वर्णन करितात त्या सर्वांस कालिमा आणून कुलाचा उपहास केलास

असें भाषण करून क्रोधानें राजाचे नेत्र आरक्त झाले आणि मनांत विचार करूं लागला की–इचा वध करावा तर स्त्रीहत्या मस्तकीं लागते. स्त्री व ब्राह्मण यांपासून जरी अनुचित घडलें, तरी त्यांचा वध करूं नये असें धर्मशास्त्र आहे, करितां इचा त्याग करावा हें बरें. नंतर राजानें दूतांस एकांतीं बोलावून त्यांस असें सांगितलें कीं, चन्द्रप्रभेच्या हातून अनुचित कर्म झालें, करितां हिला घोर आणि भयंकर अरण्यांत नेऊन सोडा. जेथें मनुष्य नाहीं, व्याघ्र, सिंह वास्तव्य करितात, अशा उद्वस्त आणि निर्जन वनीं डोंगरकपारीं नेऊन तिचा त्याग करावा. राजाचा मोहानें कंठ सद्गदित झाला. राणीस मूर्च्छना आली, सर्व राजवाड्यांत मोठा आकांत झाला. ‘ चन्द्रप्रभेच्या सख्या, मैत्रिणी रडूं लागल्या. अशा प्रकारें सर्वांस मोठ दुःख झालें.

त्यावेळीं दूतांनीं ‘ चन्द्रप्रभेचा ’ हात धरून सर्व आप्तबांधवांसमक्ष तिला विशाळ वनांत नेलें. वाचकहो ! त्यावेळेस त्या ‘ राजकन्येस ’ जें दुःख झालें असेल त्याचें वर्णन मा-

ऱ्यानें करवत नाहीं. पापकर्मांची अशी गत होते, पण बिचाऱ्या राजकन्येस ' हा दैवगतीचा डाग लागला.
दूतांनीं त्या सुकुमार ' राजकन्येस ' मोठमोठ्या घोर वनोपवनांतून पायीं चालत नेलें असतां, ती सुंदर राजबाळी दीन मुद्रेनें फार शोक करूं लागली. तेव्हां बरींच गहनवनें ओलांडून जें अतिभयानक ब्रह्मारण्य तेंही ओलांडिलें. त्याचे पुढें अनेक काननें टाकून अतिविक्राळ निर्जनवनांत तिचा त्याग केला.

# अध्याय ३ रा

## ( चन्द्रप्रभेचा वनवास व नासिकेत जन्म )

दूतांनीं परत येऊन ' राजास ' सांगितलें कीं, स्वामींच्या आज्ञेप्रमाणें अतिविक्राळ अशा महावनीं ' राजकन्येचा ' त्याग केला. त्यावेळीं ' राजास ' दुःखानें मूर्च्छना आली, व तो भूमीवर गडबडां लोळूं लागला. त्याचे केश मोकळे सुटले. नेत्रांतून अश्रुधारा चालल्या आणि हे बाळे ! हे बाळे ! आतां तुझी गति काय झाली असेल ह्मणून मोठ्यानें आक्रोश करूं लागला. तें ऐकून राणी रुदन करूं लागली व अति दारुण दुःखानें पाण्यावांचून जशी मासोळी तडफडते तशी ती तळमळूं लागली

आतां इकडे राजकन्या ' चन्द्रप्रभा ' अट्टाहासें हाका फोडूं

लागली. हातानें कपाळ झोडूं लागली आणि आपल्या कर्माला दोष देऊन ह्मणूं लागली कीं, हाय ! हाय ! माझी कर्मगति किती विपरीत ? तिनें माझ्या मातापित्याशीं अंतर पाडून ह्या घोर अरण्यांत मला आणून टाकिलें. हे परमेश्वरा ! आतां मला जीवंत कशाला ठेविलेंस ? हें दारुण दुःख मला सहन होत नाहीं. मला व्याघ्र येऊन खाईना, सर्पदंश होऊन मरण येईना. अशा रीतीनें दुर्धर आक्रंदून शोक करूं लागली. त्या शोकास पारावार नाहीं. हे जगदीश्वरा ! माझा विसर तुला कसा पडला ? वाचकहो ! यावेळेस ‘ चन्द्रप्रभेस ’ जें दुःख झालें, त्याचें संपूर्ण वर्णन केलें असतां आपलें हृदय फाटून जाईल.

असा तिचा शोक ऐकून त्या वनांतील हरीण, चित्ते, वृक, जंबूक वगैरे पशुपक्षी सुद्धां रडूं लागले वृक्ष कोमाइले, धरित्री दुःखानें उडूं लागली. तेव्हां ती ‘ राजकन्या ’ शोक संतप्त होऊन मूर्च्छित पडली. तें महाघोर ब्रह्मारण्य असून तेथें तिचें शांतवन करण्यास कोणी नाहीं. ती पद्मनयना अतिव्याकुळ होऊन अतिशय विलाप करूं लागली कीं, हे नारायणा ! मी असें कोणतें दुर्घट पाप केलें, त्याचें हें फळ भोगितें. मी कोणाचा विश्वासघात केला; किंवा अतीतास विन्मुख लाविलें, किंवा सद्गुरूचें भजन चुकलें किंवा क्षुधितास अन्न दिलें नाहीं ह्मणून मी हा भोग भोगिते ! अशा

प्रकार ती राजबाळी शोकानें संतप्त होऊन आक्रंदत असतां तेथें कोणी एक ऋषी दर्भ तोडण्यास आला. तो त्या वनांत फिरत असतां त्यानें लांबून तिचा शोकध्वनि ऐकिला; तेव्हां अशा निर्जनवनांत कोण शोक करीत आहे ह्मणून तो विस्मित होऊन धांवत आला आणि पहातो तों 'कोणी स्त्री' दुःखसागरांत बुडून गेली आहे. तिला पाहून त्याचे मनांत दया उत्पन्न झाली आणि तो मनांत असा विचार करूं लागला कीं, अशी ही सुंदर शोभायमान, चित्रासारखी सुलक्षणी, सुकुमाराकृति कोणी 'महासती' असावी किंवा ही कोणी वनदेवता किंवा सुरेश्वरी किंवा नागकन्या किंवा गंधर्वकुमारी असावी. जिचें स्वरूप पाहून अहिल्या, तिलोत्तमा सुद्धां लज्जित होतील अशी ही सुंदर स्त्री कोण असावी बरें ? जिचें तेज अतिगहन, जी नवयौवना, सुंदरवदना, विशालाक्षी, घनस्तनी अशा तिला पाहून ऋषि मोठा विस्मित झाला. कारण, ह्या घोर अरण्यांत मनुष्याचा वारा सुद्धां नाहीं आणि हें सुंदर रत्न ! एकटी शोकानें व्याकुळ झाली आहे याचें काय कारण असावें ? नंतर त्या ऋषीचें हृदय कळवळलें व जवळ येऊन तिला दयेनें विचारूं लागला.

तो ह्मणाला, हे मुली ! तूं कोण आहेस ? आणि या भयंकर अरण्यांत तुला यावयाचें काय कारण झालें व शोक कां करतेस याचें कारण काय तें मला सांग माझ्या मनांत

दया उत्पन्न झाली ह्मणून मी विचारितों तेव्हां 'चंद्रप्रभा' ह्मणाली. महाराज ! मी गंधर्वकन्या नव्हे निशाचरी नव्हे, नागकन्या नव्हे व सुरासुरीही नव्हे. अयोध्येचा राजा जो रघु-त्याची मी हतभागी कन्या आहे. माझ्या कर्मानें वेढिलें ह्मणून मी हें दुःख भोगतें. माझा वृतांत असा आहे कीं, मी अ-परिणित असून पितृगृहीं सुखसंपन्न होतें. एके दिवशीं मी गंगेवर स्नानाकरितां गेल्यें असतां तेथें विघ्न ओढवलें. तें असें कीं, आह्मी सकल स्त्रिया मिळून कांहीं वेळ जलक्रीडा केली. तों अकस्मात् शरयूमध्यें एक कमल वहात आलें तें मी परिमळार्थ अवघ्राणिलें. त्यावेळीं त्यांतून नासिकावाटे उदरांत काय गेलें तें नकळे. तेणें करून अकस्मात मी गरो-दर झालें, ह्या दोषास्तव पित्यास फार दुःख होऊन त्यानें मला या वनांत त्यागिलें. महाराज ! मी हतभाग्य; माझें कर्म विपरीत ह्मणून मला हें निरपराधें विघ्न झालें. हें मी सत्य सांगतें

असें ऐकतांच त्या ऋषीचे मन कळवळून त्याचे पोटांत दया उत्पन्न झाली आणि तो ह्मणाला, मी तुझें कन्येप्रमाणें पालन करीन, तूं माझे घरीं चल. तुझा बाप त्रैलोक्यांत कीर्ति मान् असून मोठा विख्यात आहे. त्यानें तुला आपल्या धर्माप्रमाणें दोषाभिभूत होऊन त्यागिलें, असतां तूं कांहीं चिंता करूं नको, जें होणार तें कधींही चुकावयाचें नाहीं. तूं माझी

आवडती मुलगी आहेस, लवकर आश्रमीं चल. दुःख शोक कांहीं करूं नकोस; माझ्या आश्रमीं सुखानें रहा, जें होणार तें त्रैलोक्यांत हिंडल्यानें कधीं चुकावयाचें नाहीं. अशी त्याची धर्मोक्ती ऐकून 'चंद्रप्रभेस' समाधान वाटलें आणि ह्मणाली, हे ताता! तुह्मी मोठे दयाळु आहांत. माझ्या दैवगतीनें मला भेटलांत. मग त्या ऋषीनें तिला उठवून आपले आश्रमीं आणिलें; तेव्हां तिला दुःखित पाहून तिचें सर्व ऋषि शांतवन करूं लागले.

आतां 'चन्द्रप्रभेनें' नित्य गंगेचें स्नान करून तपश्चर्या, अनुष्ठान, व्रतोपवास व प्रदक्षिणा कराव्या आणि रात्रंदिवस रामनामाचा जप करावा अशा प्रकारें ती ऋषिपत्न्यांमध्यें क्र गा करतां करतां गर्भास नवमास पूर्ण झाले.

ऐके दिवशीं ती राजकन्या सकल स्त्रियांमध्यें बसली असतां तिनें श्वास टाकिला, त्याबरोबर तिच्या नाकावाटे गर्भ पडला. तें पाहून सर्व स्त्रिया विस्मित झाल्या आणि ह्मणाल्या हा मोठा अवतारी पुरुष होईल. सर्व लक्षणीं संपूर्ण तेजःपुंज असा दैदीप्यमान पुत्र झाला, तेव्हां सर्व ऋषींनीं मिळून त्याचें जातक वर्तविलें. तो सुंदर आणि सुलक्षणी दैदीप्यमान मुलगा पाहून सर्व ऋषि ह्मणाले कीं, हा पूर्ण अवतारी आहे. नासिकावाटे जन्मला ह्मणून याचें नांव 'नासिकेत' असें ठेविलें आणि त्याचा समस्त ऋषिमंडळींनीं मंगलमहोत्सव केला. सर्व

आश्चर्य करून ह्मणाले, आजचा मोठा पर्वकाळ समजा. हें मूल सकलकुलाचा उद्धार करील.

त्यावेळीं सर्वतोमुखीं असे उद्गार निघाले कीं, चन्द्रप्रभा' निर्दोषी असून ही ईश्वरी इच्छा होय. ईश्वराची व णी विचित्र आहे, अशी तिची ते कीर्ति वर्णन करूं लागले. वैशंपायन ह्मणतात, हे भरता पुढें काय झालें तें ऐक.

ती राजकन्या 'चन्द्रप्रभा' रात्रंदिवस ऋषींची सेवा करून भगवद्भजनीं सावधान असे आणि ज्यांचा संतचरणीं विश्वास झाला, जे प्रीतीनें संतांचें भजन करतात, ते महान् पापी असले तरीही पावन होतात या संतांच्या संगतीनें परब्रह्म-प्राप्ति सहज होते. या जगांत परमेश्वर संतस्वरूपा असून त्यांच्या सेवेनें कैवल्य प्राप्त होतें, परंतु जो भाग्यवान् आहे तो संतांचें ठायीं शुद्ध भावार्थ ठेवून मोक्षास जातो आणि दुर्भागी पुरुष त्यांचे गुणदोष पहातो, तेणें करून तो नरकास जातो.

असो 'चन्द्रप्रभेनें' शुद्धभावार्थें रात्रंदिवस ऋषिसेवा आणि तप करावें, बाळकास स्तनपान द्यावें, याप्रमाणें तिचा नित्यक्रम असे. कोणे एके दिवशीं ती 'सुंदरी' ऋषिसेवेंत गुंतली असतां बालक आक्रोशें रडूं लागला त्यास मातेचें शांतवन न मिळाल्यामुळें त्यानें मोठा टाहो फोडिला, तेव्हां ऋषिशुश्रूषा संपादून ती 'राजकन्या' आश्रमीं आली आणि पह तों मूल अतिशय रडत आहे; तेणेंकरून ती दुःखानें

शोकाकुलित झाली आणि ह्मणूं लागली, तूं माझ्या पूर्वक र्मानें येथें मला प्राप्त झालास मी आपल्या बापाचे गृहीं सकलसुखानीं संपन्न असून राजभोग भोगीत होतें. तों अकस्मात् गर्भ राहून तुझ्यामुळें विघ्न झालें. तुझ्यामुळें दारुण वनवास भोगिला आणि अजूनही तूं मला छळतोस ! असें ह्मणून ती रडूं लागली. त्यावेळीं तिला पूर्वदुःखाचें स्मरण होऊन अतिशय शोकाकुलित झाली आणि क्रोधानें ह्मणाली यानेंच मला दूषण लावलें वनवास घडला माझा उपहास झाला. याच्या गर्भदोषानें उभय कुलांस बोल लागला ह किती पातकी माझ्या पोटीं आला ! माझ्या मस्तकीं निंद्यकर्म पडलें. या सर्व गोष्टींस कारण हा झाला.

असें बोलून ती सुंदरी ' नानाप्रकारें विलाप करूं लागली आणि अतिशय क्रोधानें तप्त होऊन तें मूल घेऊन गंगातीरीं आली आणि त्यास गवताचें वेष्टन करून तें तिनें गंगत सोडून दिलें आणि आपण आश्रमीं येऊन ऋषिसेवा करूं लागली.

वाचकहो ! ' ज्याला ईश्वर तारी त्यास कोणी न मारी ' अशी जी ह्मण आहे ती अक्षरशः खरी आहे. तें मूल गंगेंत वाहत वाहत जेथें ' उद्दालक' तपश्चर्या करीत होता तेथें आलें. त्यावेळीं गंगेंत ऋषि स्नान करीत होता. त्यानें तें तृणानें वेष्टिलेलें मूल वाहत येत असतां पाहिलें आणि झट-

कन बाहेर काढिलें. त्यावेळीं तो ऋषि आश्चर्यानें चकित होऊन मुलास पाहूं लागला आणि तो आपल्या मनाशीं ह्मणाला, तेजःपुंज देदीप्यमान हें मूल कोणाचें असावें बरें ! तों त्यास ब्रह्मदेवाच्या वराचें स्मरण झालें आणि स्नेहभरित होऊन आनंदानें पाहूं लागला, तों आपल्या अवयवांसारखे अवयव, मुख व नेत्र समसमान; असें पाहतांच ज्ञानानें अंतःकरणांत जाणिलें कीं, हा माझाच पुत्र; मला ब्रह्मदेवाच्या वरानें प्राप्त झाला. असें ह्मणून मोठ्या हर्षानें त्यास आपले आश्रमीं घेऊन आला आणि उल्हासानें त्या मुलाचें मंत्रोक्त विधिविधान करून यथाविधि ब्राह्मणांचें पूजन केलें. पुत्रोद्देशानें ब्राह्मणांस गोदान हिरण्यदान दिलें. तेव्हां ऋषीस जो आनंद झाला तो काय सांगावा !

तेव्हां 'उद्दालकास' ब्रह्मवचन सत्य वाटून आतां मला स्त्री प्राप्त होईल अशी त्याच्या मनाची खात्री झाली. आतां तो सुपुत्र जसजसा वाढूं लागला, तसतसें ऋषीचें प्रेम त्याजवर जास्त जडूं लागलें तो मुलगा मुळींच जीवन्मुक्त असल्यामुळें त्यानें अल्पवयांत सकळ वेदशास्त्रांचा अभ्यास केला; तेणेंकरून त्याचे अंगीं तपःस्थितीचें ज्ञान होऊन, त्याची विनयवृत्ति सर्वांस आवडूं लागली. तो रात्रंदिवस मोठ्या प्रीतीनें पितृसेवा करूं लागला. त्यानें नित्य गंगास्नान करून ध्यान, धारणा, अनुष्ठान करावें. अशा प्रकारें त्याचें

अनन्य भजन, पितृसेवेंत सावचित्त आणि पित्राज्ञाप्रतिपालन हे गुण पाहून त्याचे बापास मोठा हर्ष होई

# अध्याय ४ था

## ( चन्द्रप्रभा आणि नासिकेत यांची भेट होते )

कोणीही मनुष्य क्रोधाच्या आवेशांत जें काम करतो त्यास त्याचा पुढें पश्चात्ताप होतो, असा सिद्धांत आहे पहा, ' चन्द्रप्रभेनें' आपलें मूल क्रोधाच्या आवेशांत विचार न करितां गंगेंत टाकिलें; पण पुढें तिला पुत्रस्नेहानें जें दुःख झालें तें काय सांगावें ?

तिनें नित्य नित्य गंगेवर जाऊन ज्या स्थळीं मूल टाकिलें होतें तेथें मोठ्यानें हंबरडा फोडून शोक करावा आणि आपल्या जीवाचा अतिशय आक्रोश करून शोकाग्नीनें विव्हळ व्हावें, परंतु उपयोग काय ? देहभानरहित होऊन दाही दिशांत न्याहाळून पुत्रा ! पुत्रा ! ह्मणून ती हाका मारी आणि तें सुंदर सुकुमार डोळस बालक त्याचे गुण आठवून अट्टहासें रुदन करी. अरे पुत्रा ! तुझें वदन मला एक वेळ दाखीव. तूं कोठें गेलास ! आतां तुला मी कोठें पाहूं ! असें ह्मणून पशुपक्ष्यादिकांस विचारूं लागली कीं, माझें बाळ तुह्मीं पाहिलें का ? तें मला दाखवा. हाय ! हाय ! माझ्या बाळा ! ह्मणून तिनें आपलें अंग धरणीवर टाकिलें आणि

ह्मणाली हे मायबहिणी धरणी माते ! माझा पुत्र कोणते वनीं आहे तें सांग !

याप्रमाणें ती ' राजकन्या ' रडत, पडत, आक्रंदत, रुदन करीत असतां, एके दिवशीं त्या ठिकाणीं कांहीं पर्वणी निमित्त ' नासिकेत ' गंगास्नानास आला, तेव्हां त्यानें तो मातेचा शोकध्वनि ऐकिला; त्याबरोबर तो ऋषिपुत्र विस्मित होऊन मातेच्या जवळ आला, तों ' चन्द्रप्रभेची ' दृष्टि त्यावर पडतांच ती धांवत जाऊन तिनें मोठ्या प्रेमानें त्याच्या कंठास मिठी मारली व हातानें त्याची हनुवटी धरून त्याचें मुखचुंबन केले आणि ह्मणाली, तूं कोठे गेला होतास, तूं कोठें राहतोस, तुझें राहण्याचे ठिकाण कोणतें आणि तुझें पालन कोणी केलें ?

तेव्हां ' नासिकेत ' सांगूं लागला, हे माते ! पुण्याश्रमीं माझा पिता आहे त्यानें मातापिता आपणच होऊन माझा प्रतिपाळ केला ' ब्रह्मदेवाचा ' मानसपुत्र जो उद्दालक ऋषि त्यानें मला नदींत वाहत येत असतां काढिलें आणि आपल्या आश्रमीं नेऊन माझें उत्तम प्रकारें पालन केलें. त्याचा आश्रम या गंगेचे तिरीं आहे आणि तो मोठा ब्रह्मचारी असून त्याच्या आश्रमानजीक पुष्कळ महर्षींचे आश्रम आहेत. त्या आश्रमीं फळेंमुळें विपूल असून तापसांना सुखसंपन्न असें तें महावन आहे. मी कुशदर्भांकरितां आलों असून बराच विलंब झाला तरी हे माते ! मला जाण्याची आज्ञा दे

त्यावेळीं ‘ चन्द्रप्रभा ’ त्यास असें ह्मणाली कीं, बाळा ! आतां तूं येथून त्या ऋषीकडे जाऊं नकोस. कारण, या ठिकाणीं यज्ञशाळा आश्रम निर्माण करून फळेंमूळें सेवून आपण सुखानें राहूं.

असें मातेचें भाषण श्रवण करून, नासिकेतानें ’ उत्तर दिलें, हे माते ! मला येथें राहतां येत नाहीं कारण पितृसेवेंत द्रोह घडून मजवर पित्याचा कोप होईल, करितां मी त्याची आज्ञा घेऊन परत येतो असें ह्मणून त्यानें मातेस साष्टांग नमस्कार केला आणि तो निघून गेला.

इकडे ‘ उद्दालकऋषि ’ पुत्राची वाट पाहत होता, तो ‘ नासिकेतानें ’ येऊन त्यास नमस्कार केला तेव्हां ऋषिनें विचारिलें कीं, तुला एवढा वेळ कां लागला ? असें ऐकून ‘ नासिकेत ’ ह्मणाला, मी वनांत हिंडत असतां, गंगातीरीं माझी माता मला भेटली. ती अतिदुःखित असून वनवासी आहे, तिचे शांतवन केलें व आज्ञा घेऊन येथें आलों, करितां मजवर क्षमा करावी. असें ऐकतांच ऋषीस मोठा आनंद होऊन त्यानें त्यास आलिंगन दिलें आणि तो ह्मणाला, तुझी माता कोठें आहे आणि तिचा देश कोण व कोणत्या कुळांत तिचा जन्म झाला, तो समूळ वृत्तांत मला सांग. असें पित्याचें भाषण ऐकून ‘ नासिकेत ’ ह्मणाला–माझी माता वनामध्यें शोक करीत असतां मी तेथें अकस्मात गेलो: तिनें

मला पाहतांच धांवत येऊन माझ्या गळ्यास मिठी मारिली आणि ह्मणाली, तूं कोठें होतास आणि तुझा प्रतिपाळ कोणी केला? तेव्हां मी तुमचें नांव सांगितलें. ती गंगातीरीं ऋषि-आश्रमांत राहते. तुमचे सेवेसाठीं मी त्वरेनें निघून आलो. त्यावेळीं ऋषीस मोठें सौख्य वाटून तो ह्मणाला, आतां तूं लवकर परत जाऊन तिचा सर्व वृत्तांत विचारून आपले आश्रमीं तुझ्या मातेस घेऊन ये

नासिकेत' पित्राज्ञा मान्य करून परत मातेजवळ आला आणि तिला साष्टांग नमस्कार करून झालेला सर्व वृत्तांत निवेदन केला. तो ऐकून 'चंद्रप्रभा' कोपायमान झाली आणि ह्मणाली—कोण तुझा पिता आणि तो मला कशास बोलावितो? अरे! मी केवढ्या पवित्र कुळांत जन्मलें त्यास दोष लावूं काय? ज्या सूर्यवंशीय राजांची कीर्ति त्रैलो-क्यांतील भूपाळ वर्णन करितात, त्या 'रघुराजा' ची मी कन्या असून त्यानें मला दोषास्तव वनांत त्यागिलें. अशी मी विरुद्ध करणी केली असतां माझ्या तपाचा भंग होईल. माझें उभयकुळ निर्दोष असून तूं मला हें काय सांगतोस? जर मी स्वइच्छेनें वर मिळविला तर मला व्यभिचार घडेल आणि तूं मला सकळ दोषाचा पर्वत मस्तकावर घ्यावयास कसा सांगतोस! अधर्माची वार्ता मला स्वप्नीं सुद्धां माहीत नाहीं तो ऋषि देखिला ना ऐकिला असतां मला कसें या

चारण करितो? याप्रमाणें तिनें आपला सत्यधर्म पुत्रास निवेदन केला.

असें ऐकून, 'नासिकेत' परत आला. तेव्हां ऋषि ह्मणाला, तूं एकटाच आलास? 'नासिकेतानें' उत्तर दिलें कीं, अशी अयुक्त करणी कशी घडेल याचा विचार तुह्मींच करा. मी जाऊन सर्व वृत्त सांगितलें तें ऐकतांच माझी माता कोपायमान झाली आणि सत्य धर्मार्थ सांगूं लागली. ती ह्मणाली, मी अपर्णित 'रघुराजाची' कन्या आहे आणि तूं जो मुनि सांगतोस तो मी ऐकिला नाहीं. व देखिला नाहीं. असें असून तो कसें बोलावितो? हें सर्वथा विरुद्ध आहे. माझें उभयकुळ शुद्ध असून मी प्रसिद्ध अशी 'राजकन्या' आहे; आणि असें हें धर्मविरुद्ध कर्म केलें असतां मजला दोष लागेल. आणि आपल्या इच्छेनें भ्रतार मिळविला असतां माझी आईबापें अतिदुःखित होऊन मी वेदशास्त्रीं निंद्य असा अधर्म केल्याच्या पातकास कारण होईल; याप्रमाणें तिनें आपली धर्मतत्परता मजप्रत निवेदन केली.

असें पुत्राचें भाषण ऐकून तो ब्रह्मर्षि त्यास सांगूं लागला आतां तूं पुनः परत जाऊन आपल्या मातेस साक्षेपें असें विचार कीं, तुझा जन्म कोणते कुळीं झाला आणि तुझ्या पित्याचें नांव काय? व त्याचा कोण देश व कोणतें नगर? तुझा गर्भ कसा राहिला व हा वनवास कशानें प्राप्त झाला?

असें बापाचें वचन ऐकतांच तो सत्वर मातेजवळ येऊन तिला सर्व वृत्तांत विचारूं लागला. त्यावेळीं त्याची अंबिका सांगूं लागली. सूर्यवंशीचा अयोध्याधिपति जो ' रघुराजा ' त्याची मी, ' चंद्रप्रभा ' नामें कन्या होय. राजानें माझें पुत्राप्रमाणें प्रीतीनें पालन केलें. त्याची मजवर चांगली कृपा असे. मला पित्याचे घरीं वस्त्रें, भूषणें, अलंकार संपदादि नानाप्रकारचे राजभोगास कांहीं कमी नव्हतें; मजपुढें गंधर्वांनीं गीत–नृत्य करावें. पुष्कळ सख्या, तशाच देवकन्या, गंधर्वकन्या यांचे बरोबर मी राजगृही क्रीडा करावी. नानाप्रकारची सुखसंपदा भोगावी. तसेंच नित्य मोठ्या थाटामाटानें व गजरानें गंगेवर स्नानास जावें. तेथें सर्व स्त्रियांसह जलक्रीडा करून ब्राह्मणांस सुवर्णदान देऊन नंतर घरीं यावें.

एके दिवशीं असें झालें कीं, सकल स्त्रिया बरोबर घेऊन गंगेवर जलक्रीडा करण्यास गेलें, तों अकस्मात एक ' कमळ' वाहत आलें त्यास दर्भानें बांधिलें होतें. तो दर्भ सोडून परिमलार्थ त्याचें मीं अवघ्राण केलें तों त्यांतून श्वासाबरोबर नाकावाटे शुद्ध दुधासारखा श्वेतकण पोटांत गेला. ते मला बरोबर समजण्यांत आलें नाहीं. नंतर मी पुनः स्नान करून आपले घरीं आलें. असा दैवगतीनें विचित्र प्रकार घडून त्यापासून मला गर्भ राहिला. गर्भास पांच महिने पूर्ण होतांच तें वृत्त माझ्या मातापित्यास समजलें; त्यावेळीं पित्यास मोठा

कोप येऊन ह्मणाला. माझ्या कन्येनें दुष्कर्म केलें; त्यावेळी त्याचा कोप काय विचारावा? मला यमाचे करीत होता. पण स्त्रीहत्या घडेल ह्मणून त्यानें माझा वधन करितां दूतांच्या हातानें मला वनांत त्यागिलें.

याप्रमाणें मी अरण्यांत शोक करीत असतां तेथें अकस्मात धर्मऋषि आला; त्यानें मला शोकसंतप्त पाहून माझा वृत्तांत विचारिला. तेव्हां मी आपलें खरें खरें सर्व वृत्त त्यास सांगितलें. त्याच्या पोटांत दया उत्पन्न होऊन त्यानें मला आपले घरीं आणिलें व माझें कन्येप्रमाणें पालन केलें. अशा रीतीनें गर्भास नवमास पूर्ण झाले. दिवस पूर्ण होतांच त्या ऋषिआश्रमीं तुझा जन्म माझ्या नासिकाद्वारें झाला. या प्रमाणें मातेचा सर्व वृत्तांत ऐकून 'नासिकेत' पित्याकडे परत आला.

नंतर 'नासिकेतानें' आपल्या मातेचा सर्व वृत्तांत पित्यास निवेदन केला; तो ऐकून ऋषि मोठ्या आनंदानें ह्मणाला, मी जें चिंतिलें तें मला प्राप्त झालें. माझा मनोरथ पूर्ण होऊन आज ब्रह्मदेवाचें वचन सत्य झालें, प्रथम पुत्रप्राप्ति, नंतर स्त्रीलाभ असा मला ब्रह्मदेवानें वर दिला होता. जें कोणी कधीं ऐकिलें नाहीं व पाहिलें नाहीं तें मी आज प्रत्यक्ष आपल्या नेत्रांनीं पाहतों; याप्रमाणें 'उद्दालकास' मोठा हर्ष होऊन त्यास दैवी मायेचा वेळोवेळीं विस्मय वाटूं लागला.

त्यानें 'नासिकेतास' असें सांगितलें कीं, आतां तूं आपले मातेजवळ जा आणि मी 'रघुराजाच्या' भेटीकरितां अयोध्येस जातो. 'नासिकेत' पितृआज्ञेप्रमाणें परत आपले मातेजवळ आला.

# अध्याय ५ वा.

## ( उद्दालकाचें लग्न होतें. )

नंतर 'उद्दालकानें' मनामध्यें संतोष मानून देशोदेशींचे तपोनिधि, व महर्षि बोलावून आणिले, त्यांचीं नांवें येणेप्रमाणें:—अत्रि, गौतम, भरद्वाज, रोमहर्षण, मार्कंडेय, कश्यप, कात्यायन, भुभज तसाच दधिचि, जन्हुवर्ण, गोभिल, वर्तन, मरीचि, दुर्वास, याज्ञवल्क्य, विश्वामित्र, शक्तिऋषि, पराशर, भृशुंडी आणि अंगिरा असे असंख्य ऋषि उद्दालकानें विवाहाकरितां बोलाविले. आतां त्या ऋषिमंडळीचा थाट असा होता कीं—एकानें कृष्णाजिन परिधान केलें, तर दुसरा नग्न ( दिगंबर ), कित्येक उघडे, कित्येक बोडके, कांहीं नुसते सुडके, कांहीं अत्यन्त रोडके, अशा थाटानें ती ऋषिमंडळी मोठ्या कौतुकानें लग्नास आली. ते कांहीं कंदाहारी, कांहीं फळाहारी, कांहीं वाय्वाहारी, कांहीं निराहारी, कांहीं नस्वी, कांहीं मौनी, कांहीं ब्रह्मचारी, कांहीं अग्निहोत्री, कांहीं जलवासी, कांहीं स्थलवासी, कांहीं विवरवासी असा तो ऋषिमंडळीचा समुदाय मिळून 'उद्दालक' अयोध्येस निघाला.

असो. सर्व मंडळीसह ‘ उद्दालक ऋषि ’ अयोध्येस येऊन शरयूचे तीरीं उतरला आणि राजास कळविलें कीं, ऋषि-मंडळी नदीतीरीं येऊन प्राप्त झाली आहे. तें ऐकून राजा मोठ्या उल्हासानें त्यांस सामोरा आला आणि त्यानें त्यांनां मोठ्या सन्मानानें नगरांत आणिलें. त्यांची उत्तम प्रकारें पूजा करून त्यानां षड्रस भोजन दिलें.

नंतर हात जोडून राजानें विनंति केली कीं, आज माझें मोठें भाग्य ह्मणून संतांचें दर्शन झालें. तेणें करून कोटी यज्ञांचें फल मला प्राप्त झालें. माझा जन्म सफळ झाला. माझें सकल पुण्य फळास आलें ह्मणून संतसमागम घडला आणि मला पावन केलेंत. तरी आपण कोणत्या कार्याकरितां आलां तें मला सांगा. मी आपल्या सेवेंत तत्पर आहें, असें राजाचें भाषण ऐकन ऋषि संतोषानें बोलूं लागले, राजा ! तुझें कल्याण असो. आह्मीं आपले आश्रमीं तुझ्या धर्मानें धनधान्यादिकेंकरून सर्वदा सुखी आहोंत. हे राजा ! तुझ्या अंतःकरणांत भूतदया असून ब्राह्मणभजनीं तुझा विश्वास आहे. तुझे ठायीं वीर्य, धैर्य, गांभीर्य, दया, दक्षता, असून शौर्य आणि औदार्य फार आहे. अशी तुझी त्रिभुवनांत ख्याति आहे. तरी तुजप्रत सकळ दानांमध्यें जें प्रधान असें कन्यादान, तें मागावयास आह्मी आलों आहोंत. तूं दानशूर आणि उदार आहेस अशी तुझी कीर्ति ऐकून आह्मी सर्व ऋषि

कन्यादानासाठीं आलों आहोंत. तरी त्याचा तूं संकल्प करावा.

असें ऋषींचें वचन ऐकून राजा ह्मणाला, महाराज ! आपण अश्व, गज, हिरण्य, भूमि यांशिवाय माझ्या घरांत जें अपूर्व संग्रहीं असेल तें मागावें. पण मला कन्यारत्न नाहीं मला एक सुंदर कन्या होती पण तिला दैवगति झाली. असें ह्मणतांच सर्व ऋषींनीं जयजयकार केला आणि ह्मणाले राजा तुझी कन्या जी 'प्रभावती' ती ऋष्याश्रमीं आहे आणि तिची ख्याति ऐक. ती नवयौवना सुंदर असून सत्यव्रती व सदाचारी कन्या तूं ब्राह्मणास निर्धार करून दे. असें ऐकतांच राजास मोठा हर्ष होऊन तो विचारूं लागला—माझी कन्या खरोखर जिवंत आहे काय ?

तेव्हां ऋषि तिचा वृत्तांत सांगूं लागले कीं—ब्रह्मदेवाचा मानसपुत्र 'उद्दालक ऋषि' मोठा विख्यात असून त्यानें संतती करितां तप केलें. तेणेंकरून 'ब्रह्मदेवास' संतोष होऊन त्यानें असा वर दिला कीं प्रथम पुत्र आणि नंतर स्त्री प्राप्त होईल. ती विचित्र करणी ऐक. 'ब्रह्मदेवाचा' वर प्राप्त झाल्या दिवसापासून 'उद्दालकास' अहर्निशीं ध्यानीं मनीं स्त्रीध्यास लागला; तेणेंकरून एके दिवशीं त्याचें वीर्य स्रवलें. तें त्यानें कमलकलिकेंत घालून त्यास दर्भग्रंथि बांधिली आणि गंगेंत सोडून दिलें. तें कमळ 'प्रभावती'

स्नान करीत असतां तिचेजवळ वाहात आलें; तें तिनें घेऊन अवघ्राणिलें व श्वास ओढतांक्षणींच तें वीर्य नाकावाटे जाऊन तिला गर्भ राहिला आणि तूं दोषमिषें तिचा त्याग केलास. ती वनामध्यें रडत असतां, तिला धर्मऋषि भेटला; त्यानें तिचें शांतवन करून तिला आपल्या आश्रमीं घेऊन आला व तिचें कन्येप्रमाणें पालन केलें.

तेथें ती ' सुंदरी ' ऋषिसेवा करून सदाचारानें कालक्रमणा करितां करितां गर्भास नवमास पूर्ण होऊन तिच्या नासिकद्वारें पुत्र जन्मला, असें मोठें आश्चर्य झालें. त्याचें नांव ' नासिकेत. ' तो मोठा तपोनिधि आहे. त्यानें हा सर्व वृत्तांत सांगितला. याप्रमाणें पूर्ववृत्तांत ऋषिमुखानें ऐकून राजा सद्गदित होऊन मोहानें मूर्च्छित झाला.

मग राजा आपला शोक सांवरून अंतःपुरांत आला आणि नंतर त्यानें तें सर्व वृत्त राणीस निवेदन केलें. तेव्हां ती अतिशय शोक करून ह्मणाली, अहाहा ! हे ' प्रभावती ! ' तुला निरपराधानें वनांत टाकिलें. त्यावेळीं तुझी काय दशा झाली असेल ? असें दुःख तुझ्या भशीबीं होतें काय ? तूं सुकुमार सुंदर ' राजकन्या ' असून आह्मीं तुला घोर भयंकर अरण्यांत निर्दयपणें त्यजिलें. याप्रमाणें राणी हृदय फाटे असा आक्रोश करूं लागली. त्यावेळीं तेथें सर्व आप्त सुहृद येऊन त्यांनीं दुःखाचा मोठा कोल्हाळ करून कपाळ पिटूं लागले.

नंतर राणी शोक आटोपून राजास ह्मणाली, आज या ऋषींचे केवढे उपकार झाले ! अशी शुभवार्ता आणून त्यानीं आह्मांस जीवदान दिलें. त्यांच्या उपकाराच्या उत्तीर्णास जीवापरतें कांहीं दिसत नाहीं; तरी काया-वाचा-मनें करून कन्या अर्पण करावी; मनांत कोणत्याही प्रकारचा विकल्प न धरितां लवकर ' प्रभावती ' स घेऊन यावें आणि तिचें ऋषीबरोबर लग्न लावावें. तेव्हां राजा ह्मणाला, हा नेमानेम पूर्वींच ब्रह्मदेवानें केला; त्यांत आमचेकडे कोणताच दोष नाहीं.

याप्रमाणें राणीचा विचार घेऊन राजा सभेंत आला आणि मोहानें व शोकानें विव्हळ होऊन त्या ऋषीप्रत असें ह्मणाला—महाराज ! धन्य तुमचा महिमा ! आपण आह्मांस जीवदान दिलें. मी आपला मोठा कृतोपकारी झालों. मी कायावाचामनेंकरून आपल्या चरणीं शरण असून माझी कन्या तुह्मांस दिली. असें राजाचें वचन ऐकतांच सर्व ऋषि जयजयकार करून आनंदानें निर्भर झाले.

त्यावेळीं राजानें आपला सर्व दळभार सिद्ध केला. नानाप्रकारचीं मंगलवाद्यें वाजूं लागलीं. सर्व ठिकाणीं आनंद होऊन प्रजाजन महोत्सव करूं लागले. रत्नखचित पालखी आणि सर्व सैन्यास ऋषींच्या बरोबर देऊन ' प्रभावती ' स आणावयास सांगितलें. तेव्हां ते राजदूत ऋष्याश्रमीं येऊन त्यांनीं सर्व वृत्त तेथल्या सकळ ऋषींस निवेदन केलें आणि

ह्मणाले–आह्मांस राजानें लग्नसोहळ्याकरितां पाठविलें आहे; असें ऐकतांच तेथील सर्वांस मोठा आनंद होऊन ऋषींनीं जयजयकार केला व ऋषिपत्न्या आश्चर्य मानूं लागल्या.

नंतर सकलकलासुशोभित असा जीचा मुखेंदु ती राजकन्या ‘ प्रभावती ’ रत्नखचित सुखासनीं बसवून मोठ्या गजरानें नगरांत आणिली. त्यावेळीं अयोध्येमध्यें जो आनंद झाला तो काय सांगावा ? ब्राह्मण शांतीपाठ ह्मणूं लागले; भाट वंशावळीची गर्जना करूं लागले; याचकांचा मोठा थाट जमून रस्त्यानें वाट मिळेना. नगरांत घरोघरी गुढ्या–तोरणें उभारिलीं; त्यावेळीं राजानें मोठ्या उत्साहानें ऋषींची पूजनें आरंभिलीं आणि अधिकारपरत्वें अति संभ्रमें करून अर्घ्यपाद्यादिकें सर्वांचें पूजन केलें, नंतर सर्व राजांचें पूजन करून त्यांना गंधाक्षता, सुमनमाळा, वस्त्रालंकार, परिमळादि देऊन त्या ऋषिमेळ्याचा आणि सकळ राजे यांचा मोठा आदर केला.

नंतर रत्नखचित सिंहासनावर ‘ उद्दालकाची ’ विधियुक्त पूजा करून त्यास वस्त्राभरणें लेवविलीं. वेदघोष अपार झाला. सर्व जयजयकारें गर्जना करूं लागले. आकाशांत देवांचीं विमानें दाटलीं व त्यांनीं दुंदुभी वाजविल्या. ‘ प्रभावतीस ’ दिव्यालंकारीं सुशोभित करून वेदविधीनें तिचें लग्न लाविलें. त्यावेळीं राजगृहीं मोठा परमानंद होऊन ऋषींनीं वेदमंत्रांचा गजर केला. तसाच गीतनृत्यवाद्यध्वनि सुरू झाला.

स्वर्गीच्या अप्सरा नाचूं लागल्या. त्या अयोध्येंत आनंदी-आनंद झाला. अशा सुसमयीं ऋषींत वरिष्ठ 'उद्दालक' आणि पतिव्रतांत श्रेष्ठ 'प्रभावती' या दोघांना शेषषाट भरिले. राजानें कोट्यावधि गोदानें, रत्नदानें, मुक्ताफळें आणि सुवर्णदानें ब्राह्मणांस देऊन सर्व याचक सुखी केले. तसेंच जामातास कोट्यावधि गायी, सहस्रावधि शृंगारलेले हत्ती, लक्षावधी घोडे, कोट अयुतें सुवर्ण, दासी, सेवक आणि अलंकार–भूषणें आंदण दिलीं.

अशा रीतीनें लग्नसोहळा संपवून राजानें सर्वांचा अत्यादर गौरव केला. तो आनंद भूमंडळांत मावेना. अशी ईश्वरी लीला विचित्र आहे.

याप्रकारें 'प्रभावतीचें' पाणिग्रहण झाल्यावर राजाची आज्ञा घेऊन ते सकळ ऋषि आपापल्या आश्रमीं निघाले. तेव्हां राजानें लोटांगण घालून ऋषींना नमन केलें आणि त्यांचे बरोबर 'प्रभावतीस' देऊन आपण जामाताची बोळवण केली; नंतर सर्व ऋषि आनंदानें आपापले ठिकाणीं गेले व 'प्रभावती' सह 'उद्दालक' आपल्या आश्रमीं सुखानें राहिला.

---

# अध्याय ६ वा.

## ( नासिकेतास पित्याचा शाप होऊन तो यमपुरीचें आक्रमण करितो. )

जनमेजय ' राजा ' वैशंपायनास ' विनंति करू ला-

गला कीं, महाराज! तुमच्या कथामृतपानीं मी तृप्त झालों. आतां ‘नासिकेतास’ पित्यानें कां शापिलें आणि त्यास यमपुरी कशानें प्राप्त झाली ती त्रिजगतीं पावन करणारी कथा मला सांगावी. त्यावेळीं ‘वैशंपायन’ ह्मणाले–राजा! श्रीहरीचें चरित्र मोठें अगम्य आहे. ‘नासिकेत’ महापावन, महाअद्भुत तपोनिधि तिहीं लोकांत विख्यात होता. आतां त्याचें चरित्र ऐका. ‘उद्दालक’ आपल्या भार्येसह तप करीत असतां, त्यास अनुकूल, शुद्ध, सात्विक आणि पतिभजनीं रत अशी त्याची स्त्री ‘प्रभावती’ असून त्याचा पुत्र ‘नासिकेत’ हाहि पितृभजनीं अनुरक्त होता; त्यानें नित्य नित्य वनांत जाऊन फळें, मुळें व कुश, दर्भ ‘शिवार्चनास’ घेऊन यावें आणि पितृसेवेंत अहर्निशीं तत्पर असावें.

असो. कोणे एके दिवशीं तो वनांत फिरत असतां त्यानें एक निवांतस्थळ पाहिलें. तें रम्य असून फळपुष्पांनीं शोभायमान होतें; तेथें नानाप्रकारचे पक्षी असून शुक, सारिका, चकोर, हंस व मयूर हे निर्वैरपणें राहून सुखसंपन्न होते; शिवाय मोठमोठे उंच आणि सरळ असे वृक्ष व त्यांची घनदाट छाया. तसेंच नाना पुष्पजातींचे परिमळ, तसेंच मंद सुगंध सोडणारा मलयानिल, बिल्व, चंदन नागचंपक, देवदारु व पारिजातक असे अनेक प्रकारचे वृक्ष असून तेथें वसंतीं कोकिळा सुस्वराकुन बोलत होत्या।

असें तें जीवशिवांना समाधान देणारें वन पाहून 'नासिकेताचें' चित्त विश्रांतियुक्त झालें व त्यास मोठा आनंद वाटला; नंतर तेथें त्यानें स्नान करून शिवार्चनास आरंभ केला. यथाविधि पूजन करून तो ध्यान धरून बसला. ईश्वरस्वरूपांत त्याचें मानस दृढ होऊन, चित्त परब्रह्मीं समरस झालें. तेव्हां त्याची समाधि लागून त्यास देहभावाचा विसर पडला; अशा रीतीनें समाधिस्थितींत सहा महिने निघून गेले.

'नासिकेत' समाधिसुखसंपन्न असतां त्यास देहादि प्रपंचभान नसून तो आपआपणांतें विसरला. तेथें मी आणि तूं हें द्वैत उरलें नाहीं; याप्रमाणें अर्ध वर्ष लोटल्यावर त्यास अवचित देहस्मृति होऊन पितृसेवेस उदित झाला. त्यावेळीं तें ध्यान विसर्जन करून डोळे उघडले आणि सावध होऊन झडकर आश्रमीं आला; बरोबर फळेंमुळें, अनेक जातींचीं पुष्पें, कमलें, कुश, इंधनें, दर्भ, समिधा वगैरे मोठ्या प्रीतीनें तत्पूजनार्थ घेऊन आला आणि तें पित्याचे पुढें ठेवून त्यास साष्टांग नमस्कार केला.

त्यावेळीं पुत्रास पाहतांच उद्दालकास मोठा कोप येऊन त्यानें विचारिलें कीं, तूं आजपर्यंत कोठें होतास ? तूं आमचा स्वधर्म बुडविलास. असा तूं मोठा महाखळ वैरी आहेस. तूं ब्रह्मकर्म बुडविलेंस, नित्यनैमित्तिक धर्म बुडविलास, असा

आमचे वंशीं परमाधम जाहलास आणि नियम तर मनस्वी आचरतोस. आह्मी ब्रह्मऋषि ब्राह्मण. आह्मास त्रिकाळ गायत्रीचें अनुष्ठान असून स्नान, संध्या वंदन, नित्ययज्ञ करावा लागतो; तसेंच नित्य अग्निहोत्र करून तेणें देव, पितर तृप्त होतात. अग्निमुखें सुरवरांस संतोष होतो. यज्ञानें सूर्य, सोम, इंद्र व यम हे संतोष पावून तृप्त होतात. तो आमचा नित्यनेम बुडवून तूं पापमति अधम झालास.

असें पितृवचन ऐकतांच ‘ नासिकेतानें ’ उत्तर दिलें कीं, अग्निहोत्रादिक कर्मै हीं भवबंधनास कारण होत. यांचे पासून जन्ममरण चुकावयाचें नाहीं. हा भवसागर तरावयास नेहमीं योगाभ्यास व नित्यानित्य विवेक करून तत्वसार शोधावें. योगाभ्यासाशिवाय भवमुक्तीस दुसरें साधन नाहीं. यज्ञादिक कर्मै प्राण्यास संसारप्रवाहीं घालितात. जे शतावधि यज्ञ करितात ते पुण्यबलानें स्वर्गीं जातात. पण तें पुण्य सरलें ह्मणजे त्यांस पुन्हां कर्मभूमीस लोटतात आणि ते नवमास मातेच्या उदरीं पुरीष–मूत्र–जंतूंत राहून जन्ममरणाच्या दुःखसागरांत निमग्न होतात; ह्यास्तव यज्ञादिकर्मानुष्ठानानें प्राण्यास जन्म आणि मरण यांत उसंत न मिळून अनिवार दुःख भोगावें लागतें. भवसागर तरण्यास प्राण्यानें नित्यानित्यविचार करून असार त्यजावें आणि सार तें नित्य सेवावें. नित्य तो परमात्मा आणि अनित्य हें प्रपंच–मिथ्या

भान. तें त्यजून सर्व लोक नित्य परिपूर्ण परब्रह्म होतात. पहा, ब्रह्मादित्रय देवता नित्य चिन्मय सेवितात. स्वस्वरूपीं लय लावण्यास हाच उपाय होय. अध्यात्मज्ञान संपादून तत्व विवरण केलें ह्मणजे स्वतः पूर्णब्रह्म होतो. मग तेथें कर्मबंधन कोठचें येणार ? ज्यापासून पुनरावृत्ति चुकेल ती निजात्मस्थिति साधन करावी. करितां संसाराची निवृत्ति करून परब्रह्म प्राप्ति साधावी. हा संसारसागर तरण्यास नेहमीं ज्ञानाभ्यासें हृदयीं चिदचिन्मात्र घ्यावा. तेथें अग्निहोत्रादि कर्में हीं संसारांतील फल देणारीं दुर्गम होत. संसार हा मोठा भ्रम आहे असें वेदशास्त्र सांगतें. यासाठीं हे ताता! हा संसार त्यजून स्वानुभव तत्व पावावें असें वेदशास्त्रांचें मत आहे.

याप्रमाणें पुत्राचें वचन ऐकून 'उद्दालक' ह्मणाला जे महर्षि आहेत ते वेदविधानानें वागतात. भृगु आदि प्रमुख सप्तऋषि आहेत ते यज्ञादिक कर्में करून त्रिदश देवांना तृप्त करितात. त्यांचा तूं उच्छेद कशास करतोस ? यासाठीं तूं आपलें मत सोडून वेदविहिताशीं रत हो, आणि यज्ञादि समस्त कर्मांचें आचरण कर. देवाचें अर्चन केलें असतां, ते संतुष्ट होऊन आपणास फळ देतात तें यथेच्छ भोगावें. आतां तूं वेदविरुद्ध सर्व मत सोडून यज्ञादि उचित क्रिया आचरून समस्त पाखंड टाकून दे. त्यावेळीं 'नासिकेत' ह्मणाला— वेदांत सांगितलें तें प्रमाण आहे, परंतु त्यांत निमग्न झाल्यानें

संसारबंधन चुकणार नाहीं. संसारासारखा वैरी या चराचरा-मध्यें दुसरा नसून जन्ममरणरूपी दुःखसागरांत जो निमग्न करितो. करितां संसारनिवृत्ति करणें हीच खरी तपस्थिति आणि यज्ञादि कर्मे संसारपंथांत प्राण्यास जुंपितात. जसें घाण्याच्या बैलास वाटतें कीं ' मी दिगंतरास गेलों पण त्याचे डोळ्याचें ढांपण काढिलें म्हणजे त्यास जेथेंच्या तेथेंच आहें असें वाटूं लागतें, तसेंच यज्ञादि कर्में प्राण्यास भवचक्रांत फिरवित असल्यामुळें त्यास अहर्निशीं विसावा मिळत नाहीं. करितां आत्मनिष्ठीं मन राखून ईश्वरभजनी सावधान राहिल्यानें जन्ममरण चुकून सुख आणि सर्व सिद्धि प्राप्त होतात. एकेश्वरी प्राप्ति वांचून सर्व कर्में निष्फळ होत.

असें पुत्राचें भाषण ऐकतांच ऋषि क्रोधायमान झाला आणि त्यानें त्यास दारुण शाप दिला कीं, तूं अविहित पाखंड बोलतोस, तुला यमपुरी प्राप्त होवो. असा क्रोधानें शाप देतांच, ' नासिकेत ' निश्चेष्ट प्रेतासारखा धरणीवर पडला तेव्हां तो योगबलानें आपला प्राण सांवरूं लागला; असें पाहतांच ऋषि भयभीत झाला व तेथें सर्व ऋषि येऊन हाहाःकार झाला. त्यावेळीं ' उद्दालक ' शोकाकुलित होऊन प्रभावती ' ही पुत्रमोहानें विव्हळ झाली आणि सर्व आश्रमांत हलकल्लोळ होऊन गेला.

तेव्हां कांहीं वेळ नासिकेत ' व्याकुळ होऊन. त्यानें योग-

बळें आपला प्राण सांवरून नेत्र उघडले आणि बोलूं लागला कीं, हे ताता ! तुमच्या वचनें करून मी सदेह यमपुरीस जाईन. तुमची मजवर कृपा असावी. असं ऐकून उद्दालक अतिशय शोक करून बोलूं लागला कीं, मजकडून हा केवढा अन्याय झाला ? मी शायशी हजार वर्षे तप केलें तें या क्रोधानें व्यर्थ झालें. तुझ्या तपाची ख्याति देवदानव वाखाणितात आणि मी आपलें तप अर्धक्षणांत सर्व गमाविलें व पुत्रास अंतरलों! या क्रोधाची अगाध प्रौढी त्यानें पितापुत्रांत ताडातोड केली

आतां 'उद्दालकास' पुत्रशोक सहन न होऊन त्यास अनिवार दुःख झालें आणि तो पुत्रांस बोलूं लागला कीं, यमपुरी भयंकर व तिचा मार्ग अतिशय घोर. तेथें वैवस्वत राजा असून घोर भयंकर वैतरणी नदी वाहात आहे. ती पाहातांच प्राणी हाहाःकार करितात. तेथें पुत्रा तूं कसा जाशील? तो मार्ग ज्वालाकुलित असून जागोजागीं क्रमिनरकांचे पर्वत आहेत व रस्ता धूमांकित मोठा दुर्धर उल्लंघितानां प्रण्यास फार क्लेश होतात. मी केवढा पापी, मतिहीन; ऐहिक परत्रास मुकून दुःखार्णवीं निमग्न झालों; याप्रमाणें तो ऋषि मोहानें दुःख करीत असतां त्यावेळीं 'नासिकेत' म्हणाला–ताता ! व्यर्थ शोक कशास करतां ? तुमचें वाक्य ब्रह्मदेवाच्यानेंही असत्य करवणार नाहीं. पुरुषानें आपलें सत्य सांभाळावें, तें सोडल असतां

त्यास मान राहात नाहीं. सत्याच्या बळानें आकाशांत सूर्य तापत आहे सत्यानें मेघ वर्षाव करितात. सत्यानें अग्नीस दीपन, सत्यानें वायूस चलन. सत्यानें चंद्रास शीतळपणा. सत्यानें समुद्राचें आचमन केलें. सत्यें क्षिति धारण केली आणि सत्य सर्वांभूतीं भगवंत, सत्य हीच स्वधर्मस्थिति, सत्यानें परमगति प्राप्त होते. तसेंच सत्य हाच सर्वात्मा सर्वोत्तम, सत्यमेव परब्रह्म आणि सत्य ते नरनारायण होत. यासाठीं पुरुषानें सतत सत्य करावें. तेणेंकरून प्राणी वैकुंठास जातात. सत्यानें सर्वांस तरणोपाय होतो पण सत्यधर्मानें जें संसारांत वागत नाहींत ते कल्पपर्यंत नरकांत राहतातः यासाठीं तुम्हीं शोक करूं नका. कारण, शोकानें सत्याचा नाश होईल. नशीबीं जें होतें तें अचूक झालें. शोक निरर्थक कशास करितां ? तुमच्या सामर्थ्यानें मी या यमपुरीस सदेह जाईन आणि यमधर्माची भेट घेईन.

असें बोलून ‘ नासिकेतानें ’ पित्यास साष्टांग नमस्कार केला. त्यावेळीं ऋषि व प्रभावती दीनवदन करून रडूं लागलीं. त्याच्या मुखावाटे शब्द निघेना. मातेला शोकाकुलित पाहून तिचे चरणीं त्यानें मस्तक ठेऊन सांगितलें कीं, शोक करूं नका, या प्रकारें माता–पित्यांस वंदन करून अनुक्रमें सर्व ऋषींस वंदन केल आणि त्यानें यमरीपुचा मार्ग धरिला.

तो हृदयीं शिवमंत्राचा जप करीत व मुखानें शंकरनामाची गर्जना करीत अंतरिक्षांतून मनोवेगें चालिला. परब्रह्मबोधानें ज्याचें चित्त लीन झालें आणि ब्रह्मरसीं समरस होऊन, स्वस्वरूपीं मग्न होत्साता परमानंदें मार्ग क्रमूं लागला. ज्यानें शिवनामाची जपमाळा अविस्मरण हृदयीं धरिली, तें नाम त्यास जळीं स्थळीं तारितें, त्यास कळिकाळ बाधेना. काळ कृपाळु होऊन त्याची आज्ञा शिरीं वंदन करितो. असा नामाचा महिमा असून तें केवळ परब्रह्म आहे. नाम चराचरांस पावन करून महा दोषीजनांस उद्धरितें. त्याची अंतर्भक्ति पाहून स्वर्गींचे देव व सिद्ध विस्मय करूं लागले. अशा रीतीनें तो आपल्या सामर्थ्यानें अर्धक्षणांत यमपुरीस दिव्यतेजें विराजमान झाला. ज्या ठिकाणीं सिंहासनावर वैवस्वत राजा धर्माधर्म निर्णय करितो आहे तेथें तपोनिधि आला.

---

# अध्याय ७ वा.

## ( नासिकेत यमपुरीस जाऊन परत येतो. )

'नासिकेत' मुखानें शिवनामाचा' गजर करीत आपल्या सामर्थ्यानें यमपुरीस प्राप्त झाला. नाममहिमा अति अद्भुत असून तो द्वंद्वदुःखांपासून प्राण्यास मुक्त करितो ज्याची नामावर निष्ठा जडली, तो लागेल तेथें गमन करितो, त्यास

कळिकाळ वंदन करितात. असो. तो नासिकेत ’ परमानंदीं तृप्त होऊन ‘ सदाशिव ’ नामाच्या गजरें करून यमाच्या सभेंत चालला. ज्या सभेमध्यें राजा वैवस्वत ’ सिंहासनावर शोभत आहे स्वर्गींचे देव सभेंत विराजमान झाले असून महर्षि आपापल्या अधिकारपरत्वें वस्त्राभरणीं भूषित होऊन निरनिराळ्या स्थानीं आपल्या तेजानें देदीप्यमान शोभतात. तसेच भयंकर आणि अक्राळविक्राळ यमदूत हातांत नाना प्रकारचीं शस्त्रें घेऊन उभे आहेत. त्या सभेंत ‘ नासिकेत ’ बालकाप्रमाणें शोभूं लागला, किंवा तो दिव्य प्रकाशाचा गोळाच भासूं लागला आणि तो प्रज्ञावंत प्रबुद्ध असून त्याची अतर्क्य लीला पाहतांच सर्व विस्मित झाले. तो जैसा कैलासींचा शिवगण अथवा वैकुंठींहून विष्णुगण अथवा ब्रह्मभुवनींचा ब्राह्मण सभेंत यावा तसा भासूं लागला. ‘ यमधर्मास ’ पाहून त्याची तो स्तुति करूं लागला. ती अशा प्रकारें–हे कृतांता कालाग्निरुद्रा सकलगुणवैडूर्यसमुद्रा, सत्यधारा, क्रूराक्रूररूपा, अंतकांतका, स्वयंभू, समरूपा, धर्मादिकारणमूर्ते, बहुरूपाकृते, धर्माधर्मप्रवर्तका, पापतापशोधका, अज्ञानज्ञानदायका अशा बहु नामांनीं तुज नमो, तुज नमो. अशी त्याची दिव्य स्तुति ऐकून तो ‘ धर्मराजा ’ संतोषित होऊन ह्मणाला, तुझें कल्याण असो. महर्षिवर्य, आपण कोठून आला?

तेव्हां 'नासिकेत' ह्मणाला—मला माझ्या स्वामीचा वर मिळाला कीं, यमपुरीचें दर्शन करावें. मला पितृशाप झाला कीं, 'तुला यमपुरी प्राप्त होवो' तरी प्रभुआज्ञा समर्थ आहे ह्मणून पितृशापें येथें आलों. जे सत्यानें वागून सुकृत करितात ते कोठें राहतात आणि दुष्कृत करणारांस काय गति प्राप्त होतें तें पाहण्यास आलों आहें.

असें त्याचें वचन ऐकून यमधर्मानें आपल्या दूतांस आज्ञा केली कीं, 'नासिकेतास' बरोबर घेऊन त्यास सर्व पुरी दाखवावी. हा 'ऋषि' सत्यव्रतपरायण असून वेदशास्त्रांत अतिसंपन्न आहे. पितृशापासाठीं हा तपोनिधि येथें आला आहे. तरी यास संपूर्ण पुरी दाखवा. अशी 'धर्मराजाची' आज्ञा होतांच त्या किंकरांनीं साष्टांग प्रणाम करून त्या 'तपोधनास' घेऊन निघाले. ते चौघे दूत प्रथम 'नासिकेतास' घेऊन चित्रगुप्ताचे ठिकाणीं आले. जे चित्रगुप्त, सकळांचें शुभाशुभ लिहितात, तेथें येऊन त्यानीं द्वारपाळाचे हातीं निरोप पाठविला कीं— 'यमधर्मानें' या ब्राह्मणास पुरीदर्शनार्थ पाठविलें आहे. द्वारपाळानें सत्वर 'चित्रगुप्तास' कळविलें कीं, 'धर्मराजानें' ब्राह्मण पाठविला आहें; त्याचे बरोबर राजाचे चौघे दूत आहेत. तेव्हां 'चित्रगुप्तानें' आज्ञापिलें कीं, त्यांस आंत येऊं दे. ते येतांच 'चित्रगुप्तानें' यमदूतांस विचारिलें कारणास्तव तुह्मीं येथें

आलां? तेव्हां दूतानें उत्तर दिलें कीं, हा ब्राह्मण तपोनिधि आहे यास संपूर्ण पुरी दाखवावी अशी ' धर्मराजाची ' आज्ञा आहे.

तेव्हां ' चित्रगुप्त ' विचारूं लागला की, हे ' ऋषिसत्तमा!' आपण कोणंत कार्यास्तव आलां ? आह्मांस ' धर्मराजाची ' आज्ञा प्रमाण आहे. परंतु तुझे मनांत काय अपेक्षित आहे तें यथार्थ सांग.

असें ऐकतांच ' नासिकेत ' जयजयकार करून ह्मणाला—तुमच्या दर्शनाचा महिमा अद्भुत आहे. यमधर्मासारखा तुमचा महिमा असून प्राण्यांच्या गुप्त आचरणांचें शुभाशुभ लिहितां. तुह्मी हें भूतमात्र चित्रिलें आणि त्याचें शुभाशुभ समग्र जाणतां आणि महावीर्य, पवित्र ज्ञानी असे गुणसागर आहां. तुह्मांस माझा नमस्कार आहे. लोक कायिक, वाचिक, मानसिक जें जें आचरण करितात, तें तें तुह्मांस सकल विदित होऊन त्याचें लेखन करितां. असा आपला महिमा ह्मणून आपणास नमस्ते ! नमस्ते ! ! नमस्ते ! ! !

असें त्याचें स्तवन ऐकून ' चित्रगुप्त ' प्रसन्न झाला आणि ह्मणाला—तुझ्या मनांत जें जें असेल तें तें मागून घे. असें ऐकून ' नासिकेत ' आपला वृत्तांत सांगूं लागला..मला पितृशाप अत्यद्भुत झाला कीं, ' तुजला यमपुरी प्राप्त होवो यासाठीं मी पुरी पाहावयास आलों आहें. ' यमधर्मास ' वि-

तेव्हां त्यानें बरोबर दूत देऊन तुमच्याकडे पाठविलें.

तरी कृपाळु होऊन अंगीकार करावा. सुखदुःखस्वरूप जीं स्थानें आहेत तीं व स्वर्ग–नरक कोणत्या प्रकारचे आहेत; पाप–पुण्याचीं फळें कशीं प्राप्त होतात; इत्यादि समूळ पाहण्यास्तव मी आलों आहें.

तेव्हां 'चित्रगुप्तानें' आपल्या दूतांस आज्ञा केली कीं, सकळ यमपुरी यास दाखवा त्यावेळीं 'नासिकेत' ते उभयतांचे दूत बरोबर घेऊन निघाला आणि समस्त पहातां पहातां आश्चर्ययुक्त झाला. तेथील सम–विषम प्रकारचीं पुष्कळ स्थानें पुष्कळ वनें, पुष्कळ भुवनें, नाना प्रकारचे लोक आणि त्यांच्या नाना प्रकारच्या चर्या, तसेंच कोणता स्वर्ग, कवण नरक आणि कवण्या पातकानें कवण दुःख होतें तें सकळ पाहून दूतां सह चित्रगुप्ताकडे परत आला. त्यावेळीं त्यानें त्यास दूताबरोबर यमधर्माचे भेटीस पाठविलें.

तो बालऋषि आलेला पाहून यमधर्मानें त्यास मोठ्या सन्मानानें आपणाजवळ बसविलें आणि त्याची परम प्रीतीनें सिंहासनावर अर्घ्य पाद्यादि पूजा केली त्यास दिव्य अलंकार अर्पण करून तो प्रेतपति प्रेमानें बोलूं लागला–हे ऋषिसत्तमा! संपूर्ण पुरी.पाहून येथील लोकचर्या, शुभाशुभकर्मे; तसेंच प्राण्यांचें शुभाशुभ लिहिणारा चित्रगुप्त हें संपूर्ण मनांत आणिलें ना? तेव्हां? 'नासिकेत' ह्मणाला, हे धर्मराजा! तुझ्या कृपेनें सर्व व्यवस्था पाहून माझा संपूर्ण मनोरथ पूर्ण झाला.

आतां मला मृत्युलोकीं जाण्यास आज्ञा दे. माझीं मातापितरें शोकाकुलित होऊन दुःखानें हा हा करीत असतील.

त्यावेळीं ‘ धर्मराजा ’ ह्मणाला—हे बालऋषे ! तूं सुखानें मृत्यूलोकीं जाऊन आपल्या मातापितरांस भेट. माझा तुला असा वर आहे कीं, तुला पुन्हा जन्ममरण नाहीं. संपूर्ण सुखें तुजप्रत प्राप्त होतील आणि तुझें ज्ञान—विज्ञान वृद्धिंगत होवो. तुला जन्ममरणाची बाधा न होवो, तूं सर्वदा सुख संपन्न असावें. असा वर देऊन त्यास लवकर जाण्याची आज्ञा दिली.

त्या ऋषीची अगाध ख्याति, स्वर्गीं देव वर्णन करितात भूतळीं ऋषिपंक्ति वर्णितात आणि त्याची कीर्ति ऐकून तिन्ही लोक पावन होतात; असा तो नासिकेत अर्धक्षणांत भूमंडळीं येऊन आपल्या आश्रमाजवळ उतरला. दिव्य तेजानें कांतिमान् दिव्य व सुमनांनीं शोभायमान असा आपला पुत्र पाहून मातापितरांस मूर्च्छना येऊन, त्यांच्या सर्वांगावर रोमांच उठले. त्यांच्या नेत्रीं अश्रु येऊन ते आनंदानें थरथरां कांपूं लागले ‘ नासिकेतानें ’ येऊन त्यांना प्रदक्षिणा घालून साष्टांग नमन केलें आणि उभयतांस आलिंगन दिलें. त्या वेळीं त्यांना मोठा हर्ष होऊन सर्वांस सुख—संतोष वाटला. तो आनंद सृष्टींत मावेना. ऋषीनीं जयजयकार करून त्याजवर पुष्पवृष्टि केली. ‘ उद्दालक ’ आनंदानें निर्भर होऊन

ह्मणाला–आज माझा जन्म, माझें कर्म, माझा धर्म आणि नियम सकळ सफळ झाला. मी निरपराध्यावर कोप करून शाप दिधला ! असा मी पापरूपी झालों असतां तूं मला आज निष्पाप केलेंस. तूं कुळभूषण सत्पुत्र असून हा संसारसागर तरावयास अपार कीर्ति केलीस. अशा उल्हासानें पुत्रास आलिंगन देऊन तीं दुःखवार्ता विसरली, त्यास वारंवार आलिंगन, मुखचुंबन करून मस्तक अवघ्राणिलें.

नंतर ‘ नासिकेत ’ पित्याचे सन्मुख आसनावर बसला. त्यास ‘ उद्दालक ’ हास्यवदनें बोलला–तूं त्रिभुवनांत धन्य आहेस तूं आपल्या योगाच्या सामर्थ्यें दुर्धर असा यमपुरीचा मार्ग क्रमून परत आलास. तों तेथें सकळ ऋषि आणि तपोनिधि येऊन ‘ नासिकेतास ’ पाहतांच परमाश्चर्ययुक्त झाले. त्यावेळीं उद्दालक ’ नासिकेतास ह्मणाला कीं तूं कशा रीतीनें यमपंथ क्रमून परत इहलोकीं आलास ? तो सर्व वृत्तांत सांग आणि यमपुरी कशी पाहिलीस व तेथें कोणती चर्या कशा प्रकारची आहे व दंडधारी जो ‘ यम ’ तो कशा रीतीनें राज्य करितो व तेथें लोक कसे वर्ततात, तो वैवस्वत आणि चित्रगुप्त कसा पाहिलास व तूं त्यांस कसें नमन केलेंस, तेथें भोजनपान काय आहे आणि तूं जें जें देखिलेंस तें तें संपूर्ण सांग.

असें पित्याचें वचन ऐकून ‘ नासिकेतानें ’ त्यास नमन केलें आणि तुमच्या प्रसादानें जें देखिलें तें ऐका असें ह्म

झाला. यमपुरी इंद्रपुरीसारखी शोभायमान असून तिचा मार्ग फार कठीण आहे. मी तेथें त्वरित पोहोंचलों. रत्नसिंहासनावर सुशोभित अशा वैवस्वत राजास पाहिलें तेथें ऋषिगण, गंधर्व आणि सुरवर बसले होते. 'चित्रगुप्तहि' पाहिला तो जगाचीं शुभाशुभें लिहितो. त्याचा महिमा अद्भुत आहे तेथें यमदूत आणि काळकृतांत हे भयंकर असून अतिक्रूर आहेत. तसेंच स्वर्ग आणि नरक हेही भयानक असून तेथील विविध रचना अलौकिक आहे आणि तेथें सर्व नांदतात. त्याठायीं मी जाऊन 'यमधर्माचें'स्तवन केलें; तेणेंकरून तो संतोषयुक्त होऊन त्यानें मला वरदान दिलें तें असें कीं तुला जन्ममृत्यूंची बाधा न होतां तूं अजरामर होशील. असा आशिर्वाद देऊन मला येथें पाठविलें. तुमच्या प्रसादानें मला परलोक प्राप्त झाला, असें म्हणून त्यानें पित्यास साष्टांग नमस्कार केला.

याप्रमाणें सकळ वृत्तांत निवेदन करून तो आश्रमीं पितरांसह सुखसंपन्न राहिला. आतां तेथें 'तपोधन' येऊन 'नासिकेतास' यमपुरीचे प्रश्न करितील, ही रसाळ कथा असून जगतास पावन करणारी अशी पवित्र आहे

# अध्याय ८ वा.

## ( ऋषिसमुदाय नासिकेताचे दर्शनास येऊन त्याचे मुखानें यमपुरीचा भयंकर वृत्तांत श्रवण करितात).

वैशंपायन ह्मणतात—जनमेजया ! 'नासिकेत' यमपुरीस जाऊन परत आला, ही वार्ता दिगंतरांत होउन सर्वांस मोठें आश्चर्य वाटलें. कारण, जो यमपुरीत गेला तो कधीं परत येत नसतो. ही गोष्ट ऐकून सकळ तापसांत भारी नवल झालें आणि तो वृत्तांत ऐकून मोठमोठे ऋषि, अति विख्यात अशा तपोनिधींचा समुदाय एकत्र झाला. त्यांत काळास अजित, महाऋषि, कोणी मासोपवासी, कोणास पंचाग्नि-साधनें, कोणी अधोमुख करणारे, कोणी वायु भक्षण करणारे, कोणी निरुदक, कोणी निरन्न, कोणी एका अंगुष्ठावर तप करणारे, कोणी शुष्कपर्णाहारी, अति वृद्ध वृद्ध अ हे तपोनिधि यमपुरीश्रवणार्थ आले.

शिवाय कोणी सौरस आराधन करणारे असे तेजस्वी, देदीप्यमान, तसेंच कोणाचें 'निरालंबीं आसन, तेही ध्यान विसर्जून आले, कित्येक ऊर्ध्वपादतापस, कित्येकांस सदा कपा-लासन, कित्येक संन्यास दंडधारी, कित्येक जपी-तपी-नसी मौनी, कित्येक नग्न, निःसंग आणि ब्रह्मज्ञानी असे देशोदे-शींचे महामुनी 'नासिकेताचे' दर्शनास आले. त्यावेळीं 'नासिकेतानें' सर्वांची पूजा करून त्यांचा सन्मान केला. [illegible]

ते सकळ मुनि ‘ नासिकेतास ’ आसनावर बसवून ह्मणाले- तूं यमपूरीहून आलास अशी तुझी अद्भुत ख्याति ऐकून तिच्या श्रवणार्थ हे संपूर्ण ऋषि आले आहेत तरी तो ‘ यमलोक ’ कसा आहे, तेथें कोणत्या प्रकारची वर्तणूक असून लोक कसा आचार करितात, यमकिंकर कसे आहेत, तो प्रेतमार्ग कोणत्या प्रकारें पाहिलास, तें यमनगर कोणत्या तऱ्हेचें असून राजमंदिर कसें आहे, तेथील गृहवास, वनप्रदेश आणि सर्वांस उपदेश कोणत्या प्रकारें असून त्याची स्थिति कशी आहे. तूं ‘ यमधर्म ’ कसा पाहिलास ‘ काळपाश ’ कसे आहेत; यम-दंड कशास ह्मणतात तें सर्व सांग. शिवाय तूं चित्रगुप्त आणि त्याचें मंदिर व त्याचे किंकर कसे पाहिलेस व घोर नरक कोणत्या प्रकारचा आहे. योगी, तपस्वी, ब्राह्मण यांचें आच-रण कसें असून, मानवांनीं येथें जें पापपुण्य करावें तें कसें भोगावें हें संपूर्ण सांग.

जे संसारतापानें भयभीत होऊन काळास आड करूं पहा-तात त्यांनीं काय विहित करावें आणि कोणत्या कर्मविपा-कानें यमलोक प्राप्त होत नाहीं? ह्याशिवाय तूं जें पाहिलेंस तेंही सर्वांस निवेदन कर. तूं प्रत्यक्ष ज्ञानदेवच आहेस. तुला इह पर सर्व माहित आहे. तुझें पुरीगमन ऐकून हे देशोदेशींचे तपोधन आश्चर्यानें आले आहेत.

तेव्हां ‘ नासिकेतन ’ आनंदयुक्त [illegible] आणि ऋषींना

श्रवणादर पाहून त्यानें नमस्कार केला आणि तो बोलूं लागला–मी पितृशापानें सदेह स्वर्गीं गमन करीत असतां 'शिवनामाच्या' चिंतनानें मला कोणतेंही विघ्न झालें नाहीं. नामाच्या गजरानें जसा गेलों तसाच आनंदानें परत आलों; आणि जें म्यां अति अद्भुत पाहिलें तें समस्त अवधारा. मला पितृशाप–नव्हे, तें वरदान–मिळालें. मी स्वर्गास त्वरित जाऊन रत्नखचित सिंहासनीं 'यमधर्म' पाहिला. सूर्यासमान त्याचें तेज पाहून मी स्तवन केलें. तेणें करून त्यास संतोष होऊन तो मोठ्या कृपेनें ह्मणाला–हे ब्राह्मणा! तुझ्या मनांत काय इच्छा आहे तें मागून घे. त्यावेळीं मीं सांगितलें कीं, मला आपण 'यमपुरी' दाखवावी. त्यानें आपले चौघे दूत मज ! बरोबर देऊन मला चित्रगुप्ताकडे पाठविलें. मीं त्याचे दूतांसमवेत समस्त पुरी पाहिली, नंतर 'यमधर्मा' जवळ आलों. त्यानें दयाळुपणें मला आपले आश्रमीं पाठविलें, आतां यमपुरीचा मी अद्भुत पाहिलेला वृत्तांत सांगतों तो ऐका. ती शतयोजनें विस्तीर्ण असून वनें, उपवनें व राजधानी शोभायमान आहे. तेथें कल्पतरू, पारिजातक, देवदार, नागचंपक असे अनेक अलौलिक दिव्य तरु असून, नानाद्रुम सरळ दाट असे सर्व जातींचे वृक्ष आहेत. अनेक वनें शोभिवंत असून सर्वकाळ अलिकुळें झुंकार देतात. चहूं दिशांचीं द्वारें पांच योजनें रुंद असून दशयोजनें उंचीचीं आहेत. त्यांवर मखरें, पताका,

तोरणें, रत्नखचित दामोदरें सुंदर असून नानाविचित्र शोभतात. त्यांमध्यें महाजन दिव्यतेजानें विराजमान असून मध्यें राजभुवन देदीप्यमान तेजस्वी आहे. तेथें रत्नखचित सिंहासनीं ' धर्मराज ' तेजःपुंज असून त्याचे भोंवतीं ऋत्विज, योगिराज, महाऋषि, गण, गंधर्व, विद्याधर, देव, दानव, यक्ष, किन्नर, सुरवर, नाग वगैरे समस्त बसले आहेत. अशी ती अतिगहन पुरी म्यां पाहिली. आतां कोणत्या द्वारानें कोण येतात तें ऐका.

जे सत्यवादी, दृढव्रती, शिवभक्त, मार्मिक आहेत ते पूर्व द्वारानें येतात. वसंतकाळीं जे शीतळ पानीयें दान देतात; माघमासीं इंधनें देतात, शीत निवारण देतात, तसेंच विप्रव्याधि निवारण करून दुःखितांस सुख देतात. असे परोपकारी व नित्य गंगास्नान करणारे, स्वधर्मीं ज्यांचें मन रत आहे. अक्रोधी, निर्लोभी, दानशील, शुचिष्मंत, भगवद्भजनीं रत. तसेंच परदुःखें दुःखित जाणणारे आणि मातापित्यांस देवापरी भजणारे, तसेंच गुरुभक्त, ज्यांचा श्रीगुरुचरण, कैवल्याचें अधिष्ठान आहे; असा पूर्ण निश्चय झाला. ते विमानांत बसून त्यांच्याबरोबर महर्षि, देवगण, असून गंधर्व सप्तस्वरीं गायन करितात. ते संपूर्ण पूर्वद्वारानें आगमन करितात.

आतां ज्यांचा जगांत अति स्थिर दृढभाव झाला असून जे आस्तिक देवाचिये मानितात. भगवद्भजनीं लीन का

वितात. तसेंच ब्राह्मणभजनीं नित्यादर व ज्यांना निरंतर लिंगपूजा असून जे सदा शिवभजनांत तत्पर राहतात आणि जे गंगा आदिकरून समस्त तीर्थस्नानीं रत होऊन, ज्ञानाभ्यासानें अलंकृत, दयाळु, शुचिष्मंत तसेंच ज्यांनां नित्य शिवार्चन घडून शिवभजनीं सावधान असतात, ते शिवगणांसह उत्तरद्वारानें येतात व विष्णु परमात्मा कैवल्यमूर्ति असून त्याचे नामानें त्रिजगत् तरतें; अशी पुण्यवान ज्यांची पुराणांत ख्याति आहे, तसे भक्त, अन्नदाते, गौकाजी जे रणीं पडले, ते विमानांत बसून उत्तरद्वारानें आलेले मी प्रत्यक्ष पाहिले. तसेच श्रद्धाचरणीं, देव–तीर्थे आणि ब्राह्मणभजनीं जे नटले ते देवगणांसहित पुष्पकविमानांत बसून परमपदीं येतात, असे धार्मिक आणि ईश्वरभक्तिपरायण नर विमानांत दिव्य अलंकार–सुमनांनीं विराजमान होऊन गीत नृत्य–वाद्यध्वनि व देवांगना नाचतात. अशा गजरानें स्वर्गांत येतात.

आत्तां पश्चिमद्वारानें जे पुण्यपरायण येतात त्यांचें चरित्र ऐका. जे सत्यधर्मानें प्रतिष्ठित, सत्यवादी, दृढव्रती, असून षट्शास्त्रांस मान देतात ते पूज्यभक्तीनें हरिभजन, सदाचारीं मंडण, शमदमादि साधन, अहिंसा, सत्यव्रत, यांनीं युक्त असून परापवाद ज्यांस माहित नाहींत ते आणि परदारा, परधर्म जे वमनासमान मानितात व ज्ञानी, संत, विष्णुभक्त, शैव, वैष्णव, विरक्त, सदाचारी, शुचिष्मंत ते आणि

जे जगाचें कार्य करितात व हरिभक्तांस मान देतात, तसेंच परपीडा निवारण करितात, ' ते पुण्यमूर्ति दिव्य विमानांत सालंकार बसून त्यांचे बरोबर गण, गन्धर्व, विद्याधर, देव सुमनसंभार वर्षून जयजयकार करितात व शंख भेरी आदि-करून नानावाद्यें वाजवितात व ध्वजा, पताका, छत्रें चामरें ढाळितात.

आतां दक्षिणद्वाराचा मार्ग परम दुर्घट आहे. तो ऐका. जे दुष्टजन अनेक पापें करितात, त्यांचा भोग ते येथें भोगितात, तें म्यां पाहिलें. परमात्मा पूर्ण सर्वांतरी असून तो ज्यांना दूर झाला, त्यांना मार्ग दक्षिणेचा. जो दुराग्रही, दुःशील, रौद्रकर्मी, अमंगळ, सर्वकाळ असत्यवादी, दयाहीन, तसेंच वेद-शास्त्र-पुराणनिंदा, मिथ्याज्ञानी, अल्पवादी, संतांचा विरोधक, देवदुर्बुद्धी, कुकर्मी असून गुरुभजनींपराङ्मुख, पितरीं विमुख पीडा दुःखदायक तो दक्षिणद्वारें यावयाचा. शिवाय विहिरी, कूप बाग, बगीचादि आराम मोडून देव-उद्यान, वृक्ष तोडणारे, ते कोट्यावधि येतात. त्यावेळीं ऋषींना, नासिकेत ' सांगू लागला-दक्षिणमार्ग फार भयंकर आहे. असें ऐकतांच, ते ऋषी सर्वांगीं रोमांचित झाले. जसे काजळाचे पर्वत तसे ते घोरकर्मी यमदूत, प्राण्यांस अतिदुःख देणारे असून अनेक प्रकारें पीडा करतात, अति उग्र आणि भयंकर असून केवळ काळ-कृतांताचे कंटक, असे ते ' यमदूत ' किती आहेत त्यांची संख्या

मी जाणत नाहीं. ते जेव्हां प्राण्यांस घेऊन येतात, तेव्हां ते हांका मारितात, शंख करितात, मार्ग भयानक आणि अंधःकाराचा असून त्यांना काक टोंचितात, तें दुःख सांगतां येत नाहीं. रस्त्यानें कृमि, कीटक आणि कंटक असून तो मार्ग भयंकर आणि उद्ध्वस्त आहे. त्यांतून ते अंतक प्राण्यास आणितात. जिव्हा, नेत्र, शिश्न आणि सर्वांगास वृश्चिक व सर्प डसविल्यामुळें प्राणी हलकल्लोळ करितात. तसेंच हातापायांतून दृढ शृंखळा असून वरून लोखंडाच्या पहारीनें मारितात. अशा रीतीनें त्यांना भूतप्रेत पाळ्यांच्या विशाळ वनांत आणितात. जेथें सिंह, शार्दूल-रीस व व्याघ्र त्यांची दाटी आहे. तेथें ते, 'यमकिंकर' प्राण्यांस बांधून आणितात. त्यांस ते मुद्गल, लोहदंडानें मारितात, तेव्हां प्राण्यांच्या हातींपायीं दृढबंधन असून त्यांना मुळींच मारानें उसंत मिळत नाहीं.

याप्रकारें दक्षिणमार्गानें अतिपतन, महारौरव असून कित्येक अन्नाविण म्यां पाहिले, तेही ऐका—सर्व ठिकाणीं बहुत नरककुंडें असून तीं भयंकर दुःखदायक आहेत, त्यांत प्राण्यांस घालितात, तेणेंकरून ते कासावीस होतात, प्राणी तें अतिपतन पाहून हाय ! हाय ! करून रडतात, त्यांस ते अंतक धरून नरककुंडांत टाकितात. त्याचे पुढें कुंभीपाक महाघोर आणि दुःखदायक आहे, त्यास पाहून पापीजन

मिरास दुष्टभोगांच्या गांवीं केली असें जाणावें; तसेंच परद्रव्य, परवनिता यांचा अभिलाष जो करितो तो समस्त भोग भोगितो. ब्राह्मणाचा परित्याग करून बंधुस्त्रियेशीं संग करितो त्यास संपूर्ण भोग भोगावा लागेल. तसाच निरपराधी स्त्रीस त्यागून वृद्धबंधूचा त्याग ज्यानें केला असा व मित्रघ्न दुराचारी असा म्यां भोगकुहरीं देखिला. आणखी परनिंदा करणारा व आपल्या यातीचा धर्म छेदणारा. सदा चंचलस्वभाव असे अनेक महादोषी ते ऐका:—पशुघातकी. जीवघातकी. दुष्ट-साक्षी, मोठा चेटकी, कुटिलकर्म लोकांत बोलणारा. असाही त्या नरकांत मी पाहिला.

या शिवाय आणखी पापलक्षणें ऐका. म्यां जें नेत्रीं देखिलें तें ऐकतानां तुह्मीं त्रास मानाल! दुसऱ्याचें चांगलें झालें तें पाहून ज्यास सौख्य वाटत नाहीं व दुसऱ्याचें मोठें दुःख पाहून ज्यास सौख्य वाटतें तसेंच सत्व आणि शौचविवर्जित होऊन ज्याचें चित्त पातकीं रत झालें व पराचे गुणदोष पहातो, त्यासही मी नरकीं देखिला. तसाच सूचक आणि अमं-गळ आणि क्षुद्रें काढणारा जो खळ आणि पातकी यांचे मेळे सकळ सांगतों ते ऐका—गुरूची आज्ञा उल्लंघन करणारा असा दैवहीन दारुण दुःख भोगितांना मी त्यास नरकांत पाहिलें. आणि दुसऱ्याची वृत्ति बळेंच हरण करून व सीमा फोडून अभिचोरी करणारा त्यास असिपत्रानें वाढीताव. घर फोडून

रत्नचोरी व मार्ग पाडून खाण घाली, व देवद्रव्य हरण करून अनाथास विघ्न करणारा व वट, पिंपळ, बिल्वछेदणारा, तसाच ज्याच्या वेदविहित मार्ग निंदी, अल्पज्ञानें बहुवादी, तसाच ज्याच्या हृदयीं दया नाहीं, षंढ, नष्ठ, दांभिक, अभक्त, आळशी व देवद्रोही, दुरात्मा, स्वधर्मकर्मी पराङ्मुख, देव-पितरांसी विमुख, धूर्तवादी, वंचक आणि विश्वासघातकी तसाच पितृवचनाचा भंग करणारा, स्वर्मीसुद्धा विहिताचरण न जाणणारा, शास्त्रचोर तो संपूर्ण पातकी जाणावा.

जे शिश्नोदरपरायण असून ज्यांचें मन विषयीं आसक्त झालें, असे दुराचारी, कृतघ्न ते हाहाःकारी जाणावे. तसेच जे सत्यशौचविवर्जित व कार्पण्यवृतीनें सदा कुत्सित असे असंख्यात पातकी आहेत ते दोषाची केवळ मूर्तिच समजावी. ते दक्षिणद्वाराने येऊन नरकांत महाघोर भोग भोगितात व दक्षिणद्वारीं जी भोगपुरी आहे तेथें पूयनदीतीरीं प्राण्यास फार यातना होतात, तें म्यां पाहिलें. असा दक्षिणमार्ग गहन असून अति घोरांदर, महापतन पातकी यांना आहे, तें मीं देखिलें. यासाठीं दुर्लभ नरदेह प्रप्त होऊन जे धर्माचा अव्हेर करितात, ते आकल्पपर्यंत नरकगतीं भोग भोगितात, ह्मणून प्राण्यांनीं नरदेहांत येऊन अतिदुस्तर जी माया तीमध्यें न सांपडतां धर्मकार्य साधावें. जे हरिभजन करीत नाहींत त्यांस दारुण यमयातना होतात.

# अध्याय १० वा.

## ( पातकें व त्यांचा भोग )

आतां महामुनि 'नासिकेत' यानें आणखीही जें देखिलें तें तो सांगूं लागला. प्राणी धर्माधर्म विचार न करून या संसारांत घोर दुःख भोगितात. हे सर्व स्वर्गींचे प्राणी असून मृत्युलोकीं आले. ते पुनः येथून क्षणांत जातील. कारण, कर्मानें अज्ञानरूपी अन्धःकारांत ओढून त्यांस ( षड्रिपु ) राक्षसानें सर्वस्वीं हरून नेलें. त्यामुळें ते शिश्नोदरपरायण होऊन 'जन्ममरणरूप' दारुण दुःख भोगितात.

प्राण्यास शुभाशुभकर्मांची झडती अवश्य दिली पाहिजे; ती कांहीं चुकावयाची नाहीं. आतां मी धर्मसभेंत जो वृत्तांत पाहिला तो साद्यंत ऐका. तेथें 'धर्मराज' सिंहासनावर बसून आपल्या दूतांस आज्ञा करितो कीं, महापातकी न्याय करण्यास घेऊन या. दूत प्राण्यास 'धर्मराजा' पुढें आणितात आणि त्यास विचारितात कीं, तूं काय पापपुण्य केलेंस तें धर्मसभेंत खरें सांग. तूं मृत्युलोकीं जाऊन काय दानधर्म केलास व काय कुकर्म केलेंस तें खरें खरें सर्वांस सांग. शुभाशुभ कार्य व संचित जें असेल तें तेथें चित्रगुप्त वाचून दाखवितो. तेथें धर्माधर्माचा विचार करणारे पुष्कळ महासभासद बसले आहेत त्यांचीं नांवें ऐका. सुरवर, गंधर्व आणि ऋषि हे आपल्या तपोतेजानें देदिप्यमान असून न्यायकार्यांत

मोठे विचक्षण आहेत ते–वसिष्ठ, शक्तिऋषि, पराशर, अंगिरा, रोमहर्षण, विश्वामित्र, अत्रि, गौतम, मैत्रेय, बृहस्पति, शुक्राचार्य, कश्यप, कात्यायन, दुर्वास, जन्हुवर्ण, व्यासदेव, भारद्वाज, वर्तन, गोभिल, मरीचि, भृगु, कपिल, याज्ञवल्क्य, जमदग्नि, मार्कंडेय हे सभास्थानीं शोभत असून शिवाय सनत्कुमार, सुतनु, भानुराज, पुलस्त्य, शुक, गर्गाचार्य, भृशुंडि, गालव आणि विभांडक असे धर्माधर्मविचार करणारे सर्व महर्षि बसले असून त्यांमध्यें हरिमित्र आणि सुमित्र हे दोन्ही प्रभु मुख्यासनीं बसून त्यांस वेष्टित सकळ मुनि सिंहासनीं शोभतात. ते नाना भूषणीं भूषित असून वस्त्राभरणीं शोभिवंत आहेत. जशी द्वादश सूर्यांची शोभा तसें तों स्वर्ग दिव्य तेजें प्रकाशित आहे. तेथें नाना शास्त्रें, श्रुति–स्मृति, तर्क, मीमांसा आणि राजनीति व सकळ शास्त्रांत प्रयुक्त असे धर्माधर्मविचार करितात.

त्यांच्यामध्यें रत्नसिंहासनीं तेजःपुंज ‘ धर्मराज ’ असून त्याचा महिमा वर्णवत नाहीं. मुकुट, कुंडलें, मेखला असून त्यांची विचित्र भूषणें केवळ ज्वाळमाली द्वादश आदित्यांचा शोभा शोभतो; शिवाय त्याची दीर्घ काया आणि विशाळ नेत्र व हातांत दारुण दंड धरिला असून त्याचे पुढें महिष वाहन उभें, असा आरक्तनयन तेजस्वी तो सूर्यपुत्र महाबाहु आणि परम पवित्र आहे. तो पापियांस मोठा भयंकर असून

सज्जनांचा परम मित्र आहे, त्याचे पुढें कोट्यावधि भयासुर अतिभीषण आणि विरूपाक्ष असे किंकर हात जोडून उभे आहेत. त्या 'धर्मराजाच्या' सिंहासनाखालीं पापी हात जोडून शंकित उभा राहतो व त्यास सभामंडळी विचारतात तो महादारुण पातकी असें जाणून तो सूर्यकुमर क्रो धायमान होऊन वक्रदृष्टीनें त्याकडे पाहातो. तेव्हा ते घोरकर्मी महाद्भुत दूत हातांत दंड उचलून क्रोधानें पाप्यास विचारतात कीं, तूं सुकृत दुष्कृत जें केलेंस तें 'धर्मसभेंत' सत्य सांग. असें ते दूत मोठ्या आवेशानें विचारतात आणि तो न बोलला कीं, त्यास क्रोधानें ताडितात. तेव्हां तो पापी भयभीत होऊन समस्त सांगूं लागतो

प्रथम प्राण्यास 'धर्मसभेंत' आणून त्यास शुभाशुभ विचा रतात. त्याच्या सुकृतदुष्कृतांचा निवाडा धर्मसभेंत होतो तो मी देखिला. मग त्या पापियांचें संचित सर्व ऋषि मनांत आणून त्याचा नीतिशास्त्रोक्त धर्माधर्म निर्णय करितात. त्या 'धर्मसभेंत' जसा अंधारांत सूर्य उगवतो तशी तेथें स्वधर्म-नीति प्रबुद्ध आणि प्रगट बोलते. ते ऋषि ज्ञानाचे केवळ पुत-ळे असून धर्माधर्म निर्णय करितात. आणि मनांत विचार क-रून नंतर 'धर्मराजास' निवेदन करितात: मग जसें ज्याचें पापपुण्य असेल तसें त्यास भोगावें लागतें. पण स्वमतानें दंड-ण करीत नाहींत. तो नीतिशास्त्रार्थ ऐकून 'धर्मराजा' दूतांस आज्ञा करितो कीं, हा महापातकी आहे. यास कुंभीपाकीं घाला

असे प्रेतनाथाचें भाषण ऐकतांच तो प्राणी भयभीत होतो त्यास ते ऋषि सांगतात, तेंही ऐका. अरे मूर्खा ! दुराचारा तुला नरदेह प्राप्त होऊन शिश्नोदरानें आयुष्याचा नाश केलास. तूं हरिभजन, यज्ञ, दान, नामस्मरण कांहींच केलें नसून आतां हें पतन कसें भोगशील ? पहिल्यानें ही दारुण यमपुरीची व्यवस्था जाणत नाहींत व वेद, शास्त्र आणि संत सांगतात, तें उन्मादपणें मानीत नाहींत; आतां तूं काय करणार ? तूं दुष्कर्म केलेंस ह्मणून ' यमधर्म ' दूतांस अशी भयंकर आज्ञा करितो. ' धर्मराजाचें ' उत्तर ऐकून दूत पातकी यास सांगतात कीं, तुला वक्र कुंभीपाकीं घालावें, अशी राजाज्ञा झाली आहे. असें बोलून त्यास नानाप्रकारची ते घोर कृतांत अद्भुत पीडा करतात. ' यमधर्माची ' आज्ञा प्रमाण असल्यामुळें ते दूत प्रथम दंडानें ताडण करितात तेणेंकरून प्राण्यास पूर्ण क्लेश होतात. पण तेथें कोणी सोडविणारा नाहीं. सत्य सुकृताचा कांहीं तरी ओलावा असल्यावांचून अंतकाळीं जीवाला कोणी सोडविणारा नाहीं. यासाठीं मरण दूर आहे तोंच धर्माचा ठेवा जोडावा.

ते पापी दीनवदनानें हाहा करितात व ती त्यांची जाचणी संतांनीं पाहिली असतां, ते कृपाळु होऊन बोलतात. कांरे दुष्कृत केलेंस ? वेद, शास्त्र, पुराणें सांगतात तें अमान्य केलेंस आणि आतां ही यातना सहन असून अनि-

वार पतन भोगतोस. ' कर्म करितां न मीमी कोणा भडती देतां केविलवाणा ' याचा प्रथम विचार करावयाचा नाहीं. कीं, यमयातना अनिवार आहे. तों यमदूत येऊन त्यास कुंभीपाकीं नेऊन घालतात. असें सांगतांच नासिकेत ' रोमांचित झाला आणि ह्मणाला—त्या घोर यातना भोगितां मुळींच उसंत नाहीं. तसाच आणिक महारौरव देखिला; तेथें प्राण्यास कल्पांतींही उसंत मिळावयाचा नाहीं. गो-हत्या, स्त्रीहत्या आणि गर्भघात जे करितात, त्यांचा निर्णय मीं पाहिला तो असा—त्यांचा यमदूत घाणा गाळितात. त्या दारुण यातना बोलवत नाहीं.

ज्यानें आपला श्रीगुरुस्वामी वधिला, तसाच विश्वास-घातकी, महाअधर्मी आणि वर्मानें वृद्धाचें बालक वधणारा, अशा चांडाळास आणितांना म्यां पाहिलें. त्याच्या हाता-पायांत आणि गळ्यांत दृढ शृंखळा घालून त्यास निकट मारा करीत ' यमधर्मा ' समोर आणिला तेव्हां त्यास कर्मा-कर्म विचार ऋषीनें विचारिला. त्यावेळीं तप्त कांचनासारखा शोभणारा तेजोराशी जो ' चित्रगुप्त तो वही काढून त्याचीं कर्में सांगूं लागला. यानें अगम्यीं गमन केलें व न बोलावें तें अनृत बोलिला, तसेंच अभक्ष्य भक्षिलें, सदा सर्वदा हा कामासक्त होऊन याचें चित्त भोगाविष्ट असा त्याला दयारहित असून यानें तस्करकर्म केलें, हिंसक,

चुंबक, परम कलुषित आणि सुरापानी असे दुर्गम दोष करून मिथ्यावादी, निरपराधें ठेवी दूषण याप्रमाणें 'चित्रगुप्तानें' वही वाचून सांगितलें. व असे पातकी नग्न नरक मी पाहिले. त्यांना विष्ठाकूपांत कृमि कीटक तडतडां तोडीत असून ते कर्णनासिकांपर्यंत बुडाले होते. जो आपला गुरु एकाक्षरपदाकार असून त्यास भजत नाहीं, तो चवदा इंद्र होईपर्यंत नरकांत राहतो. तसेंच जो श्रीगुरुचें विहित कृत्य आळसानें करीत नाहीं व सेवा करीत नाहीं आणि वादांत पाखंड बोलतो, असे मी त्या नरकनदीमध्यें अघोर नरक कूपांत बुडालेले म्यां पा हले. शिवाय गुरु आणि मातापितरांस निंदून त्यांचा द्वेष करितो, तो जोंपर्यंत भूमीस आयुष्य आहे तोंपर्यंत नरककूपीं वास करितो. यासाठीं गुरुपितरांचा द्वेष न करावा आणि जीवमात्रास त्रास देऊं नये. कारण यमपुरीचें दुःख दुर्धर आहे.

आणखी तेथील वर्तमान ऐका. ताम्र, कांस्य, वस्त्रहरण करितात अ ाण कन्यादानाचे वेळीं विघ्न करितात त्यांस चिरकाल उसंत नाहीं. शिवाय एकास दान देत असतां दुसरा विघ्न करितो, त्यास असिपत्रानें दंडितात आणि मुनि किंवा ब्रह्मचारी यांच्या तपास विघ्न करितात; ते दक्षिणद्वारीं ब्रह्मकल्पपर्यंत दुःख भोगितात. शिवाय दीनजनांचा घातक, मित्रघ्न, गुरुतल्पग, त्यास असिपत्रवनांत ताडितांना व

आपली मातापिता आणि गुरु यांची स्वमुखानें निंदा करितो त्यास तप्तांगारामध्यें भाजितांना मी पाहिलें. शिवाय त्यास ज्वाळावन्हींत हिंडवून, तो क्लेशाभिभूत होऊन आक्रंदन करूं लागतो. असे कोट्यावधि पातकी त्या असिपत्रवनांत मी प्रत्यक्ष पाहिले. तसेंच बाळ, स्त्री आणि वृद्धजन यास वंचून आपण भोजन करितो त्यास ते यमकिंकर पूयपंकाचें पान करवितात; तसेंच त्या असिपत्रवनांत गुरुद्रव्य हरण करणारास कृमि कीटक वेंटाळून भक्षितात व कार्याकार्या विचार न करणारे पापीयांस यमदूत बांधून ताडितांना मी देखिले. शिवाय त्या वनांत वेदविरुद्ध मत स्थापणार व स्वच्छंदानें सदा वागणार त्यास दीर्घकाळ भक्षितात.

भ्रतारवंचका ज्या नारी अधर्मी रत असून अनाचार करितात त्या व वेदविहित सांडून जो पापकर्मी रत झाला व परापवादें जल्पतो त्यास आणिक ब्राह्मणजन्म पावून जो अस्नात भोजन करितो अथवा आहुतीविण भक्षितो त्यास व ब्राह्मणाचें धन जो पापात्मा हरण करितो, परदाराभिलाषी आणि ज्याचें मन अधर्मी रत अशा पापीयांना पूयपंकनदी मध्यें विक्राळ वनचर आणि कृमिकीटक भक्षून फार यातना करितात ऋषि, देव आणि ब्राह्मणांचा जो निंदक त्यास दीर्घ काक तोडून अक्षोभ नरककुंडीं वास प्राप्त होतो, तसाच जो धर्मशास्त्राचा द्वेष करून देहात्मवादी ज्या

त्या भावार्थे व ज्यास देव, तीर्थ, ब्राह्मण भजन घडलें नसून, अतिथीचें पूजनही केलें नाहीं; त्यास नरकांत कृमि कीटकांचा डोंगरासारखा उपद्रव सोसावा लागतो. जो स्त्रि-यंशीं रत होऊन मातापितरांची उपेक्षा करितो, त्यास ते दूत करपत्रें छेदितात. जो सतसज्जनांचा द्वेषी होऊन ज्याची वासना अधर्मी झाली, तो त्या नरकनदीच्या यातनेस आ-कल्प आंदण दिला.

ज्याला परोपकार घडत नाहीं व अधर्माकडे चालतो व साधूची निंदा करितो त्यास रौरव प्राप्त होतो जो मदनानें मस्त होऊन, कार्याकार्यां विचार करीत नाहीं अशा अभा-ग्यास भयानक यमयातना होतात; असा तो दक्षिणमार्ग दुस्तर असून प्राणी दुष्कर्म आचरतात त्यांच्या शुभाशुभ कर्मांची यमधर्म ' झडती घेतो; यासाठीं नरदेहीं येऊन सावधानें ईश्वरभजन करावें म्हणजे भवबंधनाचें तें दारुण दुःख प्राप्त होत नाहीं व धर्मानें प्राणी तरतात, हें ' नासि-केतानें प्रत्यक्ष पाहिलं

# अध्याय ११ वा.

## ( यमपुरीची भयंकर जाचणी )

आतां ' नासिकेतानें ' जें अत्यद्भुत देखिलें तें संपूर्ण ऋ-षींस सांगतो—महाघोर आणि महाविशाळ तेथें इंद्रजाळ पा-

दिलें तें सकळ ऐका. धडधडित अग्निमंडळांत चोहोंकडून तीव्र वन्हि भडकलेला असून त्यांत 'यमदूत' असंख्यात प्राणी टाकितात. एकास ठेंचितात एकास टाकितात आणि कित्येक काकुळतीस येतात पण ते निर्दय दूत मानीत नसून त्यांना आणून अग्निमंडळांत कवळितात. ते यमदूत विरूप आणि विक्राळ असून महाअद्भुत व अतिभयानक आहेत. त्यांची दीर्घकाया, ऊर्ध्वकेश, तीक्ष्णदंष्ट्र आणि विक्राळ वदन पाहतांच प्राण्यांस भय उत्पन्न होऊन ते कासावीस होतात. ते यमदूत प्राण्यास मारीत मारीत आणून जळते स्तंभास भेटवितात आणि अग्नींत भाजितात. याप्रमाणें केलेल्या कर्माची प्रचिती घेऊन त्यांना छेदितात, भेदितात. नानाप्रकारची जाचणी करितात. त्यांची जिव्हा तांबडी लखलखीत व नेत्र अति आरक्त असून ते आपल्या तीक्ष्ण नखांनी प्राण्यास विदारितात. ते विकट, विरूपी आणि दुष्टमति दूत पवनवेगानें धांवत जाऊन पाप्यास बांधून आणितात. त्यांच्या हातीं, पायीं व गळ्यांत शृंखळा घालून लोहार्गळानीं मारीत मारीत त्या विशाळ वनांत आणितात, तेव्हां ते पापी बहुत भयभीत होऊन नानाप्रकारची करुणा भाकितात. त्यांस मुद्गलेचा मारा सहन करवत नाहीं, तेव्हां ते दीर्घस्वरें रडतात आरडतात, ओरडतात तरी ते सोडीत नाहींत. मूर्च्छागतास पुन्हां सावध करून, त्या वनांमध्यें आणितात व त्यास घन

थार्ये पिटितात व कोणास अग्निकुंडांत घालितात. तेव्हां ते दूत बोलतात कीं, अरे मूढा! तूं परद्रोह, परपीडा केलीस, ह्मणून ह्या यातना भोगतोस. असें बोलून ते त्यास दुस्तर मार देतात.

आतां परदारागमन करणारास जें दारुण पतन आहे तें मीं देखिलें. लक्षावधि लोखंडाच्या स्त्रिया निर्मून त्या तप्ताग्नि असतात. त्यांस आलिंगन द्यावयास लावितात. जेव्हां ते प्राणी सहसा आलिंगन देत नाहींत, तेव्हां ते बळेंच आलिंगन देववून त्यांस शेंकडों वेळां मार मारून जर्जर करतात आणि सांगतात कीं, तूं पापिया! परद्वारीं गमन करणारा. आतां या सुंदर स्त्रीस भोग. अशा कोट्यावधि स्त्रियांस ते दूत आलिंगन देववून त्यांचें मुखचुंबन व कुचमर्दन करवितात.

प्राणी त्या तप्तलोहास आलिंगन देऊं लागला ह्मणजे शेंकडों यमदंड त्याच्या मस्तकावर मारून त्यास उदंड गांजितात व तुझी कामवासना पुरीव ह्मणून त्या अनेक लोहस्त्रियांस ते भेटवितात. आतां मद्यपीयास शासन काय तें ऐका. तप्ततेलाच्या कढईत त्यास स्नान करवून तें जळत तेल त्याची जीभ ओढून त्यास प्राशन करवितात. त्यानें तें न प्राशिल्यास दंडानें मारितात व धगधगीत लोखंडानें त्याचें हृदय जाळितात; मग तो मूर्च्छा येऊन निश्चेष्टित पडतो.

भूमीवर पडला तरी त्यास ताडितात व प्रेतासारखा ओढून विशाळ वनांत टाकितात: तेथें ताडवृक्ष उपटून त्यानें त्याचीं गात्रें छेदितात आणि तो मरण पावला म्हणजे त्याचें मांस श्वान भक्षितात

जो खोटी साक्ष देतो त्यास कल्पांतीं घोर नरकांत उसंत मिळत नाहीं· त्यास तसाच प्राणघातकी यांचें शिर छेदून भयंकर नरकांत टाकितात· निरपराधी यास दुःख देणारा व जाळें घालून मृगांस बधणारा यास कल्पांतपर्यंत महादुःखाची भोगावी लागते आणि घृतचोरास घृतांत व तेलचोरणारास तेलांत तळितात! तसेंच दूध, दही आणि ताक अशा क्षुद्र तस्करास वीटमार करून रुधिरपूयपंकी घालून ते अति कुत्सित शोणित त्यास पाजितात: व उदंड मार देऊन ते विचारितात की, दुष्कृत कां केलेंस? सवारास पाश बांधून थोर जाचणी केल्यामुळें ते प्राणी हाहाःकार करितात. पण तेथें एका धर्मावांचून दुसरा कोणी सोडविणारा नाहीं. तेथें सोडविणारा ' धर्म ' तोच माता पिता आणि बंधु, त्यास सोडल्यामुळें ही जाचणी भोग, असें ते किंकर सांगतात आणि प्राण्यास महाक्रूर पीडा करतात: यासाठीं या नरदेहांत येऊन धर्माचा अव्हेर करूं नये·

ज्यानें वन छेदिलें त्यास यमदूत बांधून मारीत आणि तात व अग्निमंडळांत टाकितात: आतां तयांस अशी शंका

येईल की, हा तो देह कसें सहन करील, तरी कर्माप्रमाणें देह निर्मिला असतो पूर्वदेह टाकिला म्हणजे कीटकाप्रमाणें ते प्राणी मागील पाश मोडून नूतन देह धारण करितात असे असंख्यात देह पडलेले असून भलत्यास भलत्याच देहांत घालून यातना भोगवितात; जो भोजनांत विघ्न करतो व दुसऱ्याच्या पादरक्षा, तसेंच वस्त्र चोरितो, त्यास असिपत्राचा दारुण मारा करून, शाल्मलीवृक्षाजवळ टाकितात; जे कोणी खाद्य, पान आणि विविध फळ चोरितात त्यास नरकनदीत आणून पयःपान करवितात, ते कर्णनासिकापर्यंत चिरकाल पचून, त्यांस कृमिकीटक तोडितात. घरीं अथवा वनांत जे अग्नि लावितात त्यांस नानाप्रकारें ताडण करून अग्निमंडळांत टाकितात. पतिद्रोह व कलह करणाऱ्या अशा स्त्रियांस शाल्मलीवृक्षावर ऊर्ध्व वागुळाप्रमाणे लोंबविल्या असून त्यांना महामुद्गलानें ठोकितात. अशा असंख्य स्त्रिया मी पाहिल्या, परंतु पतिद्रोही स्त्रियांची विपत्ति फार कठीण आहे; त्यांना तप्तलोहाच्या अग्नीनें देदीप्यमान झालेल्या पुरुषास आलिंगन देववितात आणि त्यांची जीभ ओढून छेदितात व उदंड दंड हाणितात. याप्रमाणें केल्या कर्मांची झडती द्यावी लागते, ते पापी बहुत करुणा भाकितात, पण ते निर्दय दूत त्यांना सोडीत नाहींत.

पुरुषानें अगम्य गमन केलें असतां त्यास अशा प्रकारें

दंडून अग्निमंडळांत टाकितात. ज्याचें क्रूर हृदय व जो निरपराधी पतिव्रतेस गांजतो त्याची जिह्वा छेदून दारुण दुःखानें त्यास पूर्ण क्लेश देतात. जे परजीवास दुःख देतात. पराक्रोश वृथा करतात, सत्यधर्माचा द्वेष, अशास्त्री, मिथ्यावादी, अनृत, अमंगळ, सज्जनविरोधी. पितृशब्दीं विमुख आणि दुष्ट अशांना चिरकाल नरकनदींत राहवून त्यांस गृध्र, घारी. वृक आणि जंबुक विदारितात ह्मणून बुडी मारतात तों नरकांत कीटक तोडितात.

रत्न, माणिक, सुवर्ण. अलंकार यांची चोरी व परकार्यास विघ्न करणें आणि निर्धनाचा द्रव्यापहार करणारास कुंभीपाकीं घालितात व अनेक दुःखें पीडून महाघोर जाचणी करितात. जे वेद, शास्त्र, पुराणनिंदा, मिथ्याज्ञानी, छळवादी स्वधर्मउच्छेदक, धर्मशास्त्रदूषक, द्विजनिंदा, बाळ, वृद्ध, ब्राह्मण आणि कन्यापुत्रांसीं वंचन करून आपण मिष्टान्न भोजन करितात अशांना शेंकडों यमदंड पडून त्यांचा देह खंडविखंड करून त्यांस घोर नरकांत टाकितात. त्यांत कृमि कीटक अपार असून ते वृक, व्याघ्र, तडतडां तोडून तें पापशरीर भक्षितात.

असे असंख्य प्राणी पतन भोगितात; पण त्यांना कोणी निवारणारा नाहीं. इहलोकीं आणि परलोकीं सर्वत्र धर्म सुखकारक असून त्याच्यानें या लोकांत कीर्ति व परलोकीं दिव्यभोग मिळतो; यासाठीं अंतकाळींचा पाठिराखा आणि

निजसखा धर्म आहे. त्याचा अव्हेर केल्यानें कल्पांतीं सुटका नाहीं. पाप हें दुःखदायक असून त्यामुळें सकळ लोकीं निंदा होऊन परलोकीं अनिवार दुःख होतें. या नश्वर देहाच्या संगतीनें पापी वायां कर्म करून ऐहिकपरत्रास नागवितात आणि आकल्प दुःख भोगतात. हें अतिविचित्र आणि परमपवित्र 'नासिकेत' चरित्र निज धर्माचें सुक्षेत्र होय.

---

# अध्याय १२ वा

## ( भयंकर पिशाचवन आणि अग्निरूपी वृक्ष. )

आतां जे प्राणी संसारांत महाभय असून मृत्युचिंता मुळींच बाळगीत नाहींत व संत सांगत असून त्यांचें ऐकत नाहींत, त्यांस यमलोकीं परम दुःसह व परमाद्भुत मी जें देखिलें, तें समस्त ऋषिहो ऐका. असें ह्मणून 'नासिकेत' सांगूं लागतो. तेथें महादारुण विक्राळ घोर असें भयंकर पिशाचस्थळ आहे. तें पाहून प्राणी भयानें विव्हळ होतो आणि तेथें एक योजन उंच व एक योजन रुंद असा अग्नीसारखा वृक्षाकार आहे. तो शिखेपर्यंत अपार तेज असा बीभत्स अग्नितरु असून, त्याच्या पानोपानीं लोहशृंखळांनीं कंठबद्ध असंख्य प्राणी तेथें लोंबतात. कित्येकांच्या पायांत शृंखला असून त्यांना जागोजागीं टांगले आहेत. तो वृक्ष कोठेंही रिता नसून, तो महाविशाळ अग्निकल्लोळ वृक्षाकार थबकलेला

आणि त्यांस प्राण्यास वज्रदंडानें मारितात. त्या ठिकाणी शस्त्रांची खणखण मोठी असून प्राण्यास वज्रघायाप्रमाणें तिडका उठतात. असे कोट्यानुकोटी प्राणी त्या वृक्षावर संकटांत मी पाहिले.

दुष्टकर्मासाठीं असें दुःख भोगितात. हर ! हर ! तें दुःख सांगवत नाहीं; शिवाय तेथें तप्तनरक उतत असून त्यांत प्राणी गळून पडतात आग्निसारख्या धडधडीत तप्त वाळवेच्या भूमींत त्यांना नेऊन पुरतात व त्या भूमीवर पापियांस ओढितात. तोडितात आणि गडबडां लोळवितात. तेणेंकरून ते भाजतात. काळपाश गळां बांधून दुबळ्या प्राण्यांस आणितात. व त्यावर लोहागोळानें मारितात तें मी डोळ्यानें पाहिलें. ते तृषाक्रांत होऊन पाणी पाणी करतात पण त्यांना मुळींच विसावा न देतां. ते निर्दय दूत पीडा देतात. तेव्हां ते दीनवदन आणि निराश्रित दुःखानें कण्हत कुंथत हात जोडून विनवितात. काकुळतीस येऊन शरण येतात आणि त्या दूतांस करुणा भाकितात कीं. पुरे ! पुरे ! ! परंतु त्यांना दया न येऊन ते पट्टिश, मुद्गल, तोमर, कुंत, काव्या आणि कट्यार, अशा तीक्ष्ण शस्त्रांनीं मारितात. यामुळें कित्येक आक्रंदत असून तेथें मोठा हाहाःकार होतो. कोणी तळमळतो. कोणी हाका फोडितो, कोणी मोठ्यानें ओरडतो. आणि कित्येक मूर्च्छित पडतात. तें दुःख पाहवत नाहीं व सांगतांही येत नाहीं.

त्यांना यमदूत दयाळू होऊन काय बोलतात—अरे पाप्यानों! तुह्मीं पापाचरण कां केलेंत? मनुष्यदेह प्राप्त होऊन दुष्ट कर्मानें तुमचें जीवित हत झालें. सुलभ दानानें सुद्धां सुटका होते. पण तुह्मीं कांहींच केलें नाहीं यमरापाचें' दृढ शासन तुह्मांस माहीत नव्हतें काय? पापपुण्यांस न ओळखून दुष्ट आचरण आचरलां' आणि आतां व्यर्थ करुणा भाकितां त्याचा उपयोग नाहीं. आर्धी आपलें हित न जाणून पुण्य संचय केला नाहीं. जसें केलें तसें पतन भोगा अरे येथें सुलभदानानें सुद्धां त्वरित सुख प्राप्त होतें. असें असतां तुह्मीं ग्रास किंवा अर्धा ग्रास अन्नदान, तृषार्तास पाणी, अग्निमुखीं हवनही केलें नाहीं, आणि श्वान किंवा वायस यांना अन्न घातलें नाहीं. कधीं अतीताचा आदर करून त्यास नमस्कार केला नाहींस व पितृतर्पण तीर्थास गमन केलें नसून पर्वकाळीं गंगेचें स्नान केलें नाहीं; तरी आतां येथें तुह्मांला सोडवितां कोण आहे? देवतांना संतोषित केलें नाहीं गृहस्थाश्रमीं पंचाग्नि-नुप्तता केली नाहीं. अतीत• विमुख दवडून तुह्मीं एकाएकीं साक्षीवांचून मिष्टान्न भक्षिलें. अशीं संपूर्ण पातकें केलींत आणि तुह्मी खरें सांगा कीं यमयातना' भयंकर आहेत अशीं शास्त्रें गर्जून सांगतात, तें ऐकलें नव्हतें काय? तें देववचन अमान्य करून स्वयें पापें केलींतना? असें बोलून ते दूत रागानें खंडन करून पुन्हा अघोर करतात. तें स्थळ अति

भयाण असून त्या तप्त नरकांत प्राणी दुःखानें तळमळतात; त्यांत कृमिकीटक तोडून सर्प विंचू सर्वांग कवळितात. जे खोटी साक्षी देतात व मिथ्यावादी असतात, त्यांस जळत खांबास बांधून वरती जळत मुद्गलानें मारितात. असे असंख्य जीव अग्निस्तंभास बांधले असून कित्येक कुंभीपाकीं उकडतात तें म्यां प्रत्यक्ष पाहिलें.

गुरु, राजा, ब्राह्मण, गुरुभाया आणि संत सज्जन यांना महाविष्णुसमान मानून तसेंच अग्नि, ईशान, यक्ष, गंधर्व आणि ऋषिजन यांचें पूजन व माता पिता, देवतीर्थ आणि समयास आलेला अतिथी, तो यथोचित करून पूजावा; असें शास्त्रमत आहे. अतिथि विमुख गेला म्हणजे गृहस्थाची संपत्ति गेलीच. म्हणून जे धार्मिक आहेत ते धर्म संरक्षितात. त्यांना स्वर्गी सुरवर मान देतात.

ज्यानें अतिथीचें पूजन केलें, त्यास नारायणाची पूजा घडली आणि ज्यांना हरीचें पूजन घडलें त्यांनीं त्रिभुवन संवर्धिलें. धर्माचें माहात्म्य श्रेष्ठ असून सर्व पुण्यांमध्यें प्रधान आहे, असें चित्रगुप्त सांगतो कीं, धार्मिक, ब्राह्मणकार्यी तत्पर आणि सर्व भूतावर दया करणारास सुरवर वंदन करून त्याचा स्वर्गी जयजयकार करतात, असें श्रुतिस्मृति सांगत असून तें मूर्खपणानें न मानिलें व अतिथिपूजन न केलें म्हणून मी शिक्षा भोगितां असें यमदूत बोलून प्राण्यास अहुत

गांजितात. कां रे स्वहित त्यागून दोष आचरलास, सदाचाराचा त्याग करून सत्यधर्माचा अव्हेर केलास आणि अनाचार कुकर्म करून ऐहिकपरत्रास मुकलास. याप्रमाणें ते यमकिंकर बोलून पापीयास न सोडितां क्रोधानें ताडण करितात. दीर्घकाय महाप्रचंड असे ते यमदूत हातांत दंड घेऊन यमासमान उदंड धांवतात. तें वितंड म्यां देखिलें. चौताळून धांवत जाऊन पाप्यास घेऊन येतात आणि स्वामीआज्ञेनें त्यास भोग भोगवितात. असे असंख्य दूत त्या यमभुवनीं असून ते विक्राळ दंडपाणी पापीजनांस बांधून आणितात व त्यांची अनिवार जाचणी करितात. अत्यंत पातकी जाणून जसें ऋषि सांगतात, तसें पातक भोगवितात. कुंभीपाकादि महानरकांत कित्येक काळ राहून ते प्राणी असह्य दुःख भोगून त्यांस मुळींच उसंत नाहीं अशा प्रकारें केल्या कर्माची झडती घेतात असें जाणून मूर्ख मनांत समजत नाहींत हें आश्चर्य नव्हे काय? पापी जे आहेत, ते आकल्पकाळ भोग भोगून संसारसुखांत आनंद मानितात व त्यांच्या मनांत हें वैराग्य व अनुपान न होऊन त्यांस संतांचा संग आवडत नाहीं. हा पंचभूतांचा देह उसना आणिला असून जो स्वहित करीत नाहीं, हा तो आपणास आपणच वैरी झाला. प्राणी पुण्यसंचय करीत नाहींत म्हणून त्यांस यमदूत छळतात; परंतु ते बापुडे काय करणार? तत्पाशीं

कल्पपर्यंत बांधिले आहेत. त्यांची कशी मुक्तता होणार? ज्यांना संतसमागम, हरिकथा आणि धर्मवार्ता आवडत नाहीत ते दक्षिणपंथानें येतात. असें 'नासिकेतानें' सांगतांच सर्व ऋषि रोमांचित झाले.

---

# अध्याय १३ वा

## ( दैत्यांचें आणि कृतांताचें युद्ध. )

वैशंपायन ह्मणतात–हे भारता! स्वर्गी धर्माधर्मव्यवस्था अशी असून आणखी 'नासिकेत' सांगतो तें ऐक. 'धर्मराजाच्या' सन्निधानीं विक्राळ दूतांची मांदी असून ते रौद्रकर्मी महाक्रोधी आहेत. करितां दक्षिणद्वाराची वाट परम संकट आणि दुःखद क्लेशकारी असून ते प्राण्यांस भारी होतात. तें स्थान मोठें भयानक व त्याचा मार्ग दुस्तर आणि कठिण. तेथें महाघोर जी अन्नावांचून पीडा होते ती येणेप्रकारें–ते दूत नानावर्ण, नानाकृति आणि नानाशस्त्रें हातांत घेऊन भयानक कृतांत शक्तीनें पापीयांवर चौताळतात.

आतां त्यांचीं वाहनें व रूपें विशद आहेत तीं ऐका. ते बीभत्स, कोळशांसारखे काळे असून महिषावर आरूढ होऊन विक्राळदंष्ट्र, भयंकर शरीर आणि अति विस्तीर्ण आरक्त नेत्र असें त्यांचें रूप. ते वानरांवर, वृषभांवर, मृगांवर, वृक, जंबुक आणि उष्ट्रांवर, बसून पापीयांस पाशबद्ध

करून आणितात. त्यांना पाहून प्राणी भयानें विव्हळ होतात. ते कित्येक महाघोर अति विक्राळ आणि अग्निवर्ण तांबडेजाळ असून त्यांचे ऊर्ध्वकेश, जसे पर्वतास सबळ शूळ रोविले आहेत. कित्येक काळे कृष्णवर्ण भयंकर आणि अति दारुण, विरूपांगी, भोरेवर्ण असून हातांत तीक्ष्ण शस्त्रें झेलितात. त्यांचे अंगीं अमित बळ असून नेत्रीं अग्नीचा धगधगीत कल्लोळ. असे विशाळ आणि दैदीप्यमान उग्रमूर्ति ते काळाचे दूत: त्यांची भयासूर तनु, विशाळ उदर असे त्यांना पाहून प्राणियांस हलकल्लोळ होऊन, ते रोमांचित होतात.

ते दूत सिंहमुख, व्याघ्रमुख, भोरेवर्ण, पीतवर्ण असे असून शिवाय तरस, तगर, वृक आणि जंबुक तसेच श्वान, मार्जार, कुक्कुटमुख, कुत्सितवर्ण असे दुःखदायक अनेकानेक वदनविकृति असून त्यांचे रक्तनेत्र, महाघोर दुर्गंधियुक्त कृष्णवक्त्र, पिंगळकेश, लंबाकार, अति उग्र भयानक व ते हातांत काळ्या त्रिशूळ घेऊन क्रोधदृष्टीनें चपळ धांवतात. त्यांस दखतांच प्राणी त्रास पावतात व दीर्घ रुदन करितात. शिवाय शक्ति, दंड, गदा, मुद्गल हातांत घेऊन फरश, पट्टिश, तोमर, लोहदंड, भिंडिपाळ आणि मुसळें असा शस्त्रसंभार त्यांचेजवळ असून ते महाप्रतापी आहेत. ते म्यां ‘धर्मराजाच्या’ सभेंत पाहिले

त्यांना ‘ धर्मराजाची ’ आज्ञा होतांच, ते कोणास तर्जन, कोणास दारुण कंदन, कोणास पर्वतपतन, करून प्राण्यांस परम क्लेश देतात. परंतु त्यांस त्याचा त्रास न होतां ते घोर रूपी अतिकर्कश, महादुर्धर आणि निर्दय असे आहेत.

तेथें आणखी एक महासंकट आणि अति दुर्घट पाहिलें तें ऋषिहो ऐका. तीक्ष्ण असिपत्रांचें अचाट वन असून त्या विशाळ वनांत हातांत असिपत्रें घेऊन ते भयंकर यमदूत क्रूरपणानें प्राणियांस महामारी करितात. जे जीव काम, लोभ, मोह यांच्या संगतीनें दुष्कर्मी वश झाले, त्यांना असिपत्रवनांत ते यमकिंकर दारुण कंदन करितात. तें पाहून मन कंटाळून जातें. पातकी जरामृत्यूचे महाक्लेश व त्रास सोसून नानाप्रकारें विलाप करितात; परंतु त्यांस निष्कृति नाहीं. ते असिपत्राच्या माऱ्यानें भयभीत होऊन ताडफळांसारखीं त्यांचीं अपार शिरें लोंबत असतात. जे खोटी साक्ष देतात व बलात्कारें जात भ्रष्टवितात, तस्करकर्म करितात, एखाद्याचें निक्षेपिलें हरण करितात, निरपराध्यास मारितात, तसाच ब्रह्मघ्न, विश्वासघातकी आणि परम पातकी अशांना असिपत्रानें अनेक दूत ताडण करितात व त्यांच्या कंठांत शृंखळा बांधून कित्येकांस वृक्षावर लोंबविलें आहे. तेथें पुष्कळ पक्षी मिळून त्यांना भक्षितात. कोणाचें शिर छेदून नरककुंडीं घालतात व त्याचा देह छिन्नभिन्न करून पूयपंकीं निमग्न करितात. त्यांना

शाल्मलीवृक्षावर लोंबविलें त्यांची ग्रीवा तुटून कित्येक पडले, त्यांनीं पूय शोणितांचे कूप भरले आहेत. असे नानाविध गोहत्यादि पातकी यांस त्या वृक्षावर लोंबून त्यांना मुद्गलानें व लोहार्गळानें मारितात. तें दारुण दुःख डोळ्यांनीं पहावत नसून बोलतांनाही कंटाळा येतो.

आतां ' नासिकेत ' असें सांगतो कीं, ' यमाच्या ' आज्ञेनें दुष्ट असुरांस आणितांना मी पाहिलें. महारौद्र भयंकर त्याचें स्थान पर्वतीं घोरांदरांत आहे. त्यास बलात्कारानें घेऊन या. अशी ' यमाची ' आज्ञा होतांच ते महाबळी व पराक्रमी दूत सव्यहातांत दंड व वामहस्तीं पाश घेऊन आपल्या वाहनीं बसून सहपरिवारें तो कृतांत नांवाचा विख्यात दूत क्रोधानें खवळून निघाला. तो भूतळीं पर्वताच्या दरींत जेथें तो दुष्ट असुर रहात होता, तेथें येऊन सुरासुरांत शस्त्रास्त्रीं अपार युद्ध झालें. त्यावेळीं मंत्रित अस्त्राच्या मारानें ते यमदूत स्कंधीं भग्न होऊन दशदिशां पळूं लागले. ते यमधर्माजवळ येऊन सांगूं लागले कीं, त्या दानवानें आह्मांस जिंकिलें. तो असुर बलाढ्य असल्यानें आह्मांस न आटोपून त्यानें हातोहातीं विजय केला व आह्मी जीव घेऊन पळालों ते येथें आलों.

असें दूतांचें भाषण ऐकून ' धर्मराजा ' क्रोधायमान झाला आणि महाकाळास बोलावून त्याप्रत सांगूं लागला कीं, हे

काळ महाबाहो ! तूं बरोबर सैन्यसमुदाय घेऊन जा आणि त्या दुष्ट दानवास धरून आण. तुला जय प्राप्त होईल. स्वामीची आज्ञा शिरीं वंदन करून ते काळकृतांत हातामध्यें नाना आयुधें व दंड पाश घेऊन त्वरित निघाले, त्या सैन्यांत 'कृतांत' नायक असून त्याच्या हातांत लखलखित चंद्रहासखड्ग व वामकरीं दंडपाश घेऊन तो निघाला. त्यावेळीं सर्वांगीं रोम थरकत असून विक्राळ दंष्ट्रा आणि महाविशाळ त्याच्या नेत्रांतून अग्निज्वाळा निघतात असा तो 'कृतांत' वीर खवळला. त्यानें महेशवंदन पाल्हाणून बरोबर कोट्यावधि त्या यमसैन्यासह सुरांसुरांत दारुण युद्ध मांडिलें. त्यावेळीं हांका—बोंबांचा कल्होळ होऊन घनघोर युद्ध चाललें. व ते महाबळी प्रतापी वीर अग्निज्वाळांसारखीं शस्त्रें वर्षूं लागले. तेव्हां खड्गास खड्गाचें निवारण, शस्त्रांस शस्त्रांचें प्रेरण व शिळा, शिखरें, द्रुम पाषाण आणि वज्र दारुण हाणूं लागले. काठ्या, त्रिशूळ, तोमर, भिंडिपाल आणि चेंडूचक्र एकामेकांस पाचारून तें दारुण युद्ध झालें. त्यावेळीं कृतांतानें मोठी ख्याति करून तो दुष्ट दानव जिंकिला. त्याचें सैन्य भंगून शक्ति गळाली, तें सर्व काळानें तत्काळ आकळिलें. त्याच्या मागें पुढें शस्त्रधारी असून कंठांत पाश व शृंखळा घालून त्यास बलात्कारें आणिला.

त्यास दूतानें आकळून धरिला असतां, चित्रगुप्त विचारूं

लागला कीं, तूं जें आचरण केलेंस तें हें पहा, तूं बहूत दिवस चोरी करून पापास अधिकारी झालास. आतां तुला फार मार बसेल आणि तुझें मांस गीध, घारी आणि दीर्घ वायस तोडून खातील. त्यास दूतानें बळकट धरिलें असतां तो दुःखानें कासावीस झाला. महारौरव नरककुंडांत त्यास घातलें. कृमियोनि असंख्यात असून तें दुःख जन्मावर्त भोगवितात. अनेक पृथक् पृथक् जन्मांचे ठायीं त्यास दारुण दुःख भोगावें लागतें अशी तेथील वर्तणुक आहे ती म्यां संपूर्ण देखिली 'नासिकेत' ह्मणतो हे ऋषि हो! यमभुवनींच्या दुर्घट यातनांचें दुःख तुह्मीं शास्त्रद्वारें ऐकिलें पण तें मी प्रत्यक्ष पाहिलें, यासाठीं हा असार, क्षणभंगुर आणि स्वप्नप्राय संसार असून हा उत्तम देह प्राप्त झाला असतां त्यांत ईश्वरास कां भजत नाहीं! जसें स्वप्नांतील द्रव्य चोरांनीं चोरिलें तसें संसार हें मिथ्याभान आहे. असें जाणूनही लोक भजन पूजन करीत नसून ते मायाभ्रांतीनें भुलले आहेत.

आतां 'काळ' हा बाळ, वृद्ध आणि तारुण हें कांहीं पहात नसून तो सर्वांचें भक्षण करितो. संपूर्ण बाळपण भरलें नसतांही अथवा संपूर्ण तारुण्य न लोटतांही, काळ भक्षण करीत आहे. ह्मणून जेवढें साकार चराचर आहे तें सर्व काळानें भक्षिलें आहे हें वारंवार सांगावयास नको, कोठें काळ नाहीं असें मुळींच स्थळ नाहीं. गिरीं, पर्वतीं, डोंगरीं,

कपाटीं अथवा दिग्पाटीं जरी गेला तरी त्याच पाठा काळ आहे तो सोडीत नाहीं; असें जाणून सुद्धां प्राणी स्वहित करीत नाहींत. त्यांनीं अज्ञानाचा अंगीकार करून माझें आणि तुझें अशानें जन्ममरणांच्या दुःखास कवळिलें आहे. परंतु हें क्षणिक आहे, असें जाणून मृत्युचिंता करीत नाहींत व भजनपंथ धरून संसारव्यथा निवारीत नाहींत. हें काय त्यांचें अज्ञान ! पहा हो ! मी जन्मास आलों व मरणार आहें असें जाणून तें निरसावयास सहसा उपाय करीत नाहींत. या संसारवृक्षाची अशी छाया आहे कीं, याच्या विश्रांतीस जे जे पांथिक बसले, ते कोणी कोणास न विचारितां सत्वर आपापल्या स्थानीं जाणार. तें शाश्वत मानून प्राणी विषयासक्त झाले व पापानें सुपंथ चुकले. ते ऐहिकपरत्रातें मुकून दक्षिणद्वाराप्रति आले व त्यांनीं ज्या यातना व क्लेश भोगिले ते मी पाहिले. यासाठीं हा नरदेह प्राप्त झाला असतां कर्माकर्म विचारून नामस्मरण करावें.

# अध्याय १४ वा

## ( पुण्यपावन लोक विमानांत बसून परपदीं जातात. )

जनमेजयास वैशंपायन सांगतात कीं, आतां पुण्यपावन कसे येतात तें ऐका—' नासिकेत ' ह्मणतो त्या ' यम ' नगरी-

मध्यें धार्मिकांची कशी परी आहे तें निर्धारें करून सांगतों जें सदाशौच, सदाचारी असून नित्य परोपकार करतात व पापांस भितात. ज्यांचे हातून मुळींच दोष घडत नाहींत. असे पुण्यपरायण धर्मात्मे विमानांत गीत नृत्य वाद्य यांसह मोठ्या जयजयकाराच्या गजरानें पूर्वद्वारीं येतात त्यांना तेथें अतिरमणीय उत्तमस्थानें असून दिव्यासन देतात, व सघृत, क्षीर मिष्टान्नभोजन व उत्तमोत्तम उदकपान मिळतें. यथेष्ट पक्वान्नें भक्षावयास यथास्थित असून त्यांना परिधानास दिव्यांबरें व नाना विलासमंडित विचित्रभूषणाभरणीं ते सुखासनीं विराजमान असतात. त्यांचे जवळ वीणादिवाद्येंकरून नाना ध्वनीनीं गंधर्व गातात; शिवाय किरीट कुंडलें, केयूर, हार, मनोहर मुक्तमाळा वगैरे सर्वाभरणीं सालंकार ते पुण्यपावन विराजमान असतात. त्यांची पुण्यसामुग्री, व सत्यधर्माच्या प्रभावेंकरून नानाप्रकारें दिव्याप्सरा त्यांची सेवा करतात.

हेममय विचित्र भूषणें, दिव्य सुमनें आणि नानापरिमळ तेथें असून केवळ कामाच्या कळिका अशा देवांगना त्यांची सेवा करितात. तेथें वापी, कूप, तडाग निर्मळ जळें भरून, पद्मरागादि रमणीय आराम व नाना उपभोगांची समृद्धि आहे. त्यांना 'धर्मराजाच्या' प्रसादेंकरून जरावार्धक्य म्हणून नाहीं; ते चिरकाळ दिव्यदेही सुखानें राहतात. या

साठीं आत्महितार्थ धर्मसंग्रह करावा; तेणेंकरून इहपरलोकीं सौख्य मिळतें. नित्यनेमानें गुरुभजन करून संतांस नमावें आणि यथाशक्ति श्रीनारायणाच्या प्रीत्यर्थ दान द्यावें. गृहास अतिथि आल्यास मधुरवाक्य, अतिविनय व सन्मानानें त्यास यथोचित आसन देऊन त्याची पूजा करावी व यथाशक्त्या भोजन द्यावें. ज्यानें गृहीं अतिथि पूजिला, त्यास लक्ष्मीकांताचें व देव, पितर, इंद्रादिक देवांचें यथोक्त पूजन घडलें. त्याचें माहात्म्य स्वतः ' चित्रगुप्त ' व ' धर्मराजा ' वर्णन करितो. ज्यांची सर्वभूतीं पूर्ण समता असून शमदमादिसाधन संपन्न, सत्यधर्मपरायण, आहेत व जे ब्राह्मणभजन करितात, त्यांना स्वर्गीं दिव्यभोग नाना उपचार सालंकृत दिव्यदेहीं मिळून ते सुखभरित असतात.

आतां क्षत्रिय आणि धनुर्धारी शस्त्रविद्येंत निपुण असून आपल्या क्रियेनें संसारांत स्वधर्मयुक्त वर्तन करित व सत्यशील दयाळुपणें प्रजापालन करून शत्रूस पाहतांच जीवित्वास उदार होऊन, ज्यानें आपला धर्म सांगोपांग आचरला तो दिव्यविमानीं बसून अमरभुवनीं येतो. तसाच वैश्यांनीं आपला स्वधर्म आचरून सात्विकपणें यथाशक्ति दानधर्म, क्रियानेम, विनीतात्म, शुद्धसात्विक, ब्राह्मणपूजन, वाणिज्य आणि कृषिसेवक अत्यंत दयाळुपणें यथाविधि आचरिलें, त्यांस दिव्यदेहीं विमानांत बसवून त्यांच्यापुढें गंधर्व नृत्यगायन

करीत वस्त्राभरणीं सालंकृत हेमसदनीं आणितात. तसाच शूद्र तिहीं वर्णांची सेवा करून स्वधर्माचारी वर्तनानें वर्तून द्विजांस नमस्कार करितो, शिवाय ब्राह्मण षट्कर्मे करितो व शूद्र नमस्कार करितो, त्या दोघांस सारखा योग घडतो. असा आपला स्वधर्म जे आचरितात ते परधाम पावतात. असें श्रुतिस्मृतींमध्यें वर्णिलें आहे.

आतां सकळ धर्मांसी अधिष्ठान मुख्य ब्राह्मण, अग्निहोत्रादि संपूर्ण क्रिया आचरून यजन, याजन, अध्ययन, अध्यापन, दान आणि प्रतिग्रह हीं षट्कर्मे होत. याप्रमाणें चारी वर्ण आपापलें विहिताचरण, जसा ज्याचा भाग तें तें आचरण केलें असतां ते दिव्यदेहीं विमानांत बसून शोभिवंत व धवधवीत देवसदनीं येतात. तसेंच निरंतर जे आत्मानुसंधानीं असून ईश्वरभजनीं तत्पर, असे पवित्र भक्तराय सालंकार मीं विमानीं पाहिले. त्यांना नाना भोगांची समृद्धि असून दिव्यासनें, सुमनमाला आणि सकळ गणगंधर्ववेष्टित येतांना मीं त्यांस देखिलें. ते पुण्यपरायण इन्द्रभुवनीं येऊन जोंपर्यंत चंद्र–सूर्य आहेत, तोंपर्यंत सुखसंपन्न राहतात. जे गृहदान, भूमिदान देतात, त्यांस हेमखचित रत्नभुवन प्राप्त होऊन ते आकल्पपर्यंत नाना दिव्यभोग भोगितात. जे नित्य क्षुधितास ग्रास अथवा अर्धग्रास देतात व शरणांगतास दयाळु अंतःकरणानें रक्षितात व परदुःखानें दुःखित होऊन

परोपकार करितात व देवतीर्थभजनीं प्रीति ठेवितात ते धर्म-मूर्ति धार्मिक स्वर्गी उत्तमस्थान पावून आपल्या धर्मप्रसादानें सुखसंपन्न असतात. त्यांच्या सेवेंत अतिसुंदर देवांगना तत्पर असून सुरवर त्यांचा प्रेमानें अत्यादर करितात. आतां जे कोणी मुक्तें प्रवाळें दान करितात ते रत्नभुवनीं विराजमान होऊन अतिगहन दिव्यभोग भोगितात.

जे पक्कशालीचें शेत दान देतात, ते पुण्यात्मे परमपदीं येतात. तसेच छत्र, उपानह, वसंतीं शीतल उदक देतात, ते अश्वारूढ दिव्यदेही अमरावतीस येतात आणि गौ, हस्ती, तुरंगम, उष्ट्र आणि वाहनें दान देणारे ते गंधर्वगायनानें विमानांत बसून आले, त्यांना मीं पाहिलें स्वामीकार्यास ज्यांनीं आपला देह धारातीर्थी ठेविला ते विमानांत बसून सूर्यमंडळीं येतात. तसेच जे कोणी कुळवंत वर पाहून सुवर्ण आणि रौप्यसंयुक्त व शास्त्रोक्त सालंकृत कन्यादान करितात त्यांस सकळ क्षिति दान दिल्याचें पुण्य मिळून ते संपत्ति भोगितात; कन्यादानासारखें महापुण्य दुसरें नसून त्यांना देव आणि देवकन्या सेवितात. यासाठीं दया धर्मावांचून जो प्राणी राहतो तो व्यर्थ भूमीस भार होऊन देवपितरांत अप्रीय होतो, त्याचें तोंड इहपरलोकीं काळें होतें. आतां स्वर्गस्थांच्या देहीं चार चिन्हें असतात तीं ऐका—यथाशक्ति दान, विनीत आणि मधुरवचन, संतसमागम आणि विष्णुअर्चन

आतां ज्याची वृत्ति कृपण, आंग कुत्सित, हृदय मलीन नीचास शरण, आत्यंतिक क्रोधी आणि कुटिल वाणी या सहा चिन्हांनीं युक्त जो, त्यास अवश्य नरकप्राप्ति व्हावयाची. हीं स्वर्गनरकादि चिन्हें शास्त्रपुराणांत उघड सांगितलीं आहेत. तीं ऐकून सूज्ञांनीं आपलें स्वहित साधावें तेथें अनमान केला असतां, अंतीं पतन भोगावें लागतें. जसें रोग्यास मिष्टान्न आवडत नाहीं तसें पाप्यास पुण्यश्रवण आवडत नाहीं. यास उदाहरण—चंद्रप्रकाशानें जगास सुख होतें, पण कावळ्यास त्याचा उपयोग नाहीं. दुधांत कोळसा उगाळिला असतां, त्याचा वर्ण पालटत नाहीं, तसें मूढजनांस पुण्यश्रवण आवडत नसून ते जाणून घोरपतन व दारुण दुःख भोगितात.

---

# अध्याय १५ वा.

## ( पुण्यवानांस स्वर्गीचे विलास भोग. )

' नासिकेत ' हा वयानें अल्प असून ज्ञानानें मोठा होता. म्हणून समस्त ऋषि त्याचा मोठा गौरव करून म्हणाले कीं, तूं जें जें आणखी देखिलेंस तें तें साद्यंत सांग. तेव्हां ' नासिकेत ' म्हणाला—स्वर्गी अतिरमणीय सुवर्णमय विचित्र भुवनें पुष्कळ असून तीं 'धर्मराजानें' धार्मिकांकरितां निर्मिलीं आहेत. त्यांत पुण्यवान् लोक दिव्याभरणीं विभूषित असून त्यांचें 'धर्म

राजा ' पालन करितो. यमदूत सेवेंत तत्पर असतात. ते पुण्य संतति पवित्रपणें भोगितात; त्यांना अमरावती राजधानी मिळते.

आतां पूर्वद्वारानें कोण येतात तें एका आश्विन, कार्तिक मासीं जे इंधनें देतात व शीत निवारणार्थ उष्णता करून आराम देतात; तसेंच ग्रीष्मकाळीं शीतलोदक देतात ते सूर्य-लोकीं सुख भोगितात. वसंतीं पुष्पदान, नानापरिमळ, फलार्पण, सुगंधचंदन व शीतळपवन देणारासही सूर्यलोक प्राप्त होतो. जे दुष्काळांत अन्नदान करून सुभिक्षीं सुवर्ण वांटितात ते स्वर्गभुवनीं दिव्यदेही विराजमान होऊन, नानाभोग सामोपचार यावत् चंद्रदिवाकर ते अपार सुख भोगितात; व अमर त्यांचा जयजयकार करितात यासाठीं सुज्ञजन प्रयत्नें करून दानधर्म करितात, त्यांचा अगम्य महिमा मी पाहिला. जे विष्णुभक्तांचीं व ब्राह्मणांची सामोपचारें पूजा करितात, ते दिव्याभरणीं विभूषित व हंसयुक्त विमानांत बसून विचित्रवाद्यें, गीत, नृत्यांसह मोठ्या जयजयकारें गर्जत पूर्वद्वारानें येऊन, जेथें अश्व, गज, विचित्राभरणीं असून मयूर, सारस, चक्रवाक आहेत त्या स्थानीं सौख्य समाधानानें महासदनीं क्रीडा करितात. तेथें रत्नाभरणीं भूषित सालंकृत आणि दीप्तिमंत अशा देवकन्या शोभिवंत सुलक्षणी केवळ मदनमोहिनी दिव्य स्त्रिया गीतनृत्यानें त्या धार्मिकांस उपासितात व अनुदिनीं त्यांच्या सेवेंत तत्पर असतात; शिवाय

ते धार्मिक देवकन्यांसह नंदनवनांत अनुदिनीं क्रीडा करितात तें म्यां देखिलें.

तसेंच दाते, दयाळु, परमभक्त, सत्यशील आणि धर्मयुक्त हे आपल्या धर्मसंचितानें तेथें दिव्यभोग भोगितात. तरी दयाधर्माचें हेंच फळ कीं, स्वर्गीं चिरकाल सुख प्राप्त होतें. हें सकळ पुराणें सांगतात. आपलें शरीर अनित्य, क्षणभंगुर आणि नाशिवंत असून वैभवाची शाश्वती मुळींच नाहीं. तें लयास जाणारें आहे आणि नित्य मृत्यु दुराग्रहें या देहाच्या मागें लागला आहे. हें निःसंदेहें जाणून धर्म संग्रह करावा. यासाठीं सज्जन धर्मपरायण होऊन, सत्य आणि स्वधर्मानुष्ठानीं आपुल्या निष्ठेनें सावध असतात, जे सर्वकाळ, सुख प्राप्त व्हावें. ह्मणून धर्माचें फळ इच्छितात, परंतु तो त्यांचा धर्म न होऊन ते पापच आचरतात. इहपरलोकीं दैन्य, दुःख हें पापाचें फळ असून लोक तेंच इच्छितात; आतां पापाचें फळ नरक व पुण्याचें फळ सुखदायक. पुण्यानें स्वर्गसंपत्ति भोगण्यास मिळते व पापानें प्राणी पतनास जातात. असें जाणून मूर्खलोक कां पाचारण करितात? 'नासिकेत' ह्मणतो मी डोळ्यानें स्वतः पाहिलें कीं, पुण्यवान् स्वर्गसंपत्ति भोगितात व पापी पतनास जातात. धार्मिक विमानांत बसून परमपदास जातात व सकल पापियांस अंतकदूत बांधून दक्षिणद्वारानें आणितात एकास गंधर्व गायन ऐकत व सुमनमाळा

गळ्यांत घालून विचित्रलीलेनें विमानांतून स्वर्गास आणितात व एकास गळ्यांत शृंखळा घालून विशाळ घोर मार्गानें आणितात. एकास दिव्यभोगांची समृद्धि असून तो परमपदीं विराजमान असतो व एक नरकनदींत कल्पपर्यंत पचतो. एक सुवर्णमय गृहांत सिंहासनीं असून त्याची दिव्यकामिनी सेवा करितात; आणि कित्येकांकडून तप्तलोहशरीरांस आलिंगन देववितात, याप्रमाणें यमपुरीचा वृत्तांत असून पुढें ऐका.

# अध्याय १६ वा

## ( धार्मिकांस उत्तमस्थानें, पुष्पोदका आणि उद्यान )

आतां तपोधन ' नासिकेत ' सांगूं लागला कीं, अशा रीतीनें पापपुण्याची समूळ झडती घेऊन प्राण्यास केलेलें कर्म भोगवितात. तें मीं प्रत्यक्ष पाहिलें. जो येथें सुवर्णदान करितो तो सूर्यलोकीं दिव्यदेहीं विराजमान होऊन सुखसंपन्न राहतो. ज्याला वस्त्रदान घडतें तो चंद्रलोकांत गमन करितो आणि अन्नदान करणारा अमरावतीस येतो; यासाठीं संसारामध्यें सर्वप्रकारें दान श्रेष्ठ असून अंतकाळींचा साह्यकारी धर्म आहे; हें निश्चयेंकरून जाणावें. जे दयाधर्मविहीन असून धर्मरक्षण करीत नाहींत ते यमलोकीं पतन भोगून घोर नरकांत कल्पमासिकेपर्यंत बुडालेले उभे असतात व त्यांना कृमिकीटक नानाप्रकारचा उपद्रव करितात.

आतां मीं जें धर्मस्थान देखिलें तें ऐका. जेथें संतसज्जन धार्मिक आणि पुण्यपरायण राहतात, तें स्थान रमणीय असून अति उत्तम आहे. तेथें सुखसमाधान असून पुण्य-पुण्योदकानामें पवित्र नदी वाहात आहे. तिचें आचमन कर-णारे पर्वकाळ सुखी होतात; त्या पुण्यसरितेंत सुवर्ण वाळू असून नदीतीरास पद्मांकित शंखचक्रांचे पर्वत आहेत व कल्पतरु, पारिजात असे अनेक जातींचे वृक्ष सदा पुष्प-फळांनीं सुशोभित असून नाना विहंगम पक्षिजाती मयूर, सारस वगैरे क्रिडा करितात व सिद्ध गंधर्व स्वानंदें रमतात. त्यानां दिव्य भोजनें, क्षीर, घृत आणि पक्वान्नें ' धर्मराजा ' पुरवितो. तेथें जागजागीं अतिविशाल रत्नखचित धर्म-शाळा असून सिद्ध, ऋषि आणि तापसांना स्वानंदसोहळा प्राप्त होतो. कित्येक नदीतीरीं सुवर्ण वाळूवर असतात, कित्येक जलक्रीडा करितात. कित्येक मधुर पेय सेवितात. अशा या सौख्यकर रमणीय उद्यानीं ते सिद्ध ऋषि आणि मुनि दिव्या-भरणीं भूषित असून शीतळ सुगंध पवन घेत सुखसंपन्न आ-हेत आणि तेथें बालार्काप्रमाणें ज्यांची अंगकांति अशा बाला, प्रौढा आणि प्रगल्भा रंभाविलासिनी रत्नाभ-रणीं सालंकार होऊन व दिव्य वस्त्रें परिधान करून सुस्व-रानें आलाप करितात. गीत, नृत्य आणि सुंदरगायनानें रागोद्गार करून त्या धार्मिकांस नानाप्रकारें उपासितात.

अशा त्या पुण्योदकेचे तीरीं महापुरुष आणि धर्माधिकारी पूर्वपुण्यें राहतात. ती नवलपरी मीं पाहिली

जे अनन्यभावेंकरून नित्य देवपूजन करितात, ते पुण्य-ण तेथं सुखसंपन्न राहतात. त्यांच्या सेवेला विशाळन-यना, चंद्रवदना, सर्वाभरणीं सुलक्षणा अशा सुंदर देवांगना, 'धर्मराजानें' ठेविल्या असून त्या लावण्यराशी कमिनी ऋषि-तपोधनांस उपासून त्यांच्या सेवेंत तत्पर तिष्ठतात. अशा त्या महानदीचे तटीं सुवर्णवाळ्वेंत कोट्यानुकोटी ता-पस सुखानें वसतात. आणखी तेथें कोण कोण पाहिले तें ऐका. ज्यांची सर्वांभूतीं पूर्ण दया असून भावानें देवार्चन व अनन्य गुरुभजन करितात ते, जो दीनाची आर्ति हरितो, व अनाथास साह्य करितो आणि सर्वाविषयीं परोपकारी तो व अकिंचनाचें कार्य करून त्याचा गर्व धरीत नाहीं ते पुण्योदकानदीतिरीं स्वइच्छेनें क्रीडा करितात; शिवाय स-कळशास्त्रांत प्रवीण असून ज्यांना प्रज्ञाप्रबुद्ध विमलज्ञान आहे ते तेथें सुखसंपन्न असतात.

त्रैलोक्यीं अतिविख्यात जे पुण्यात्मे संत महंत आहेत त्यांना 'धर्मराजानें' त्या रत्नखचित भुवनीं ठेवून. क्षुधा तृ-षेची वेदना त्यांस स्वप्नीं सुद्धा नाहीं; व दुःख दैन्यांची आणि त्रिविधतापांची बाधा त्यांना नसून ते सुखसमाधानें क्रीडा करितात.

असे जे सत्यसुकृती नर निरंतर ईश्वरजभनांत राहून ज्यांचें चित्त परमार्थांत रत झालें, व जे भूलोकीं गात्रें शोषून तप करितात शिवाय उभय उद्वेगरहित, समसाम्य सुख-भरित, भक्त, ज्ञानी आणि जीवन्मुक्त ते सर्वदा सुखवर्ध-मान अशा उत्तमस्थानीं आनंदानें राहतात आणि परलो-कास ते पातकी येतात. त्यांचीं नानादुःखें पाहून ते दुःखी होत्साते कंटाळून त्यांना ह्मणतात कीं, अरे मूढा दुराचारा! दुर्लभ नरदेहांत येऊन विषयासक्त झालास आणि आयुष्याचा मातेरा करून वृथा पाप केलेंस. देहलोभानें नाडलास व आत्महितास विसरून गेलास; पण आतां ह्या दुर्धर यातना कशा निस्तरशील? अरे एका क्षणाच्या सुखासाठीं कोटक-ल्पपर्यंत यातना भोगावयाच्या. तुह्मांस धिःकार असो कीं, ह्या यातना भोगितां! हें शरीर नाशिवंत आहे असें जाणतें असतां कां पापकर्म आचरलां?

असे ते संत महंत पाप्यांचे क्लेश पाहून दयार्द्रचित्त होऊन बोलतांना मी ऐकिलें. 'नासिकेत' ह्मणतो—असें परम अद्भुत मीं पाहिलें. पण प्राणी त्या महापापातें नेणून दुष्कर्म करि-तात; यासाठीं मरण दूर आहे तोंच सत्य स्वधर्माचा ओलावा करून सदाशिवास शरण गेल्यानें जीवास विसावा मिळेल.

# अध्याय १७ वा

## ( यमदूत प्राण्यास तप्तभूमीवर चालवून बिकटमार्गानें आणितात )

ही दिव्यकथा मोठी गहन असून पातकास निर्दाळण करणारी आहे. आतां तो तपोधन ' नासिकेत ' यमपुरींत जो अतिअद्भुत आणि दारुण मार्ग आहे. त्याचा वृत्तांत सांगूं लागतो—तो दुस्तर व अतिकठिण मार्ग सहा हजार योजनें लांब असून, ते दूत प्राण्यास बांधून त्या मार्गानें आणितात: ती तप्तभूमिका असून आंतून अग्नीचे कल्लोळ निघतात आणि त्या महाविशाळ धगधगीत ज्वाळा पाहून प्राणीगण व्याकुळ होतात. तेथून अतिघोरांदर, महाभयानक आणि अंधकाराचा मार्ग आहे. तो चालतांना प्राण्यास अतिदुस्तर क्लेश होऊन अपार दुःख होतें; तेथून पुढें मार्ग अतिविस्तीर्ण उंच पर्वतांतून असल्यामुळें चढतां उतरतां प्राण्यास दारुण दुःख होऊन त्यावर मार्गांत परमतीक्ष्ण लोहाचे कांटे आहेत. ते पाहून दृष्टि व काळीज फाटून जातें. तेथून पुढें मार्ग खतखता लाक्षा उतत आहे. त्या वाटेनें यमदूत प्राण्यांस बलात्कारें चालवितात. तेथून पुढें तीक्ष्ण कंटकांचें घोरारण्य असून मार्गानें संकीर्ण खणखणतात आणि तेथें संपूर्ण अंधकार आहे; त्यांतून अग्नीचें बळ संभवत असून ज्वाळा अकस्मात

निघतात तेणेंकरून प्राण्यास थोर आक्रांत होतो. तोही क्रमितां पुढें मार्गानें दारुण शैत्य असल्याकारणानें ते जीव हिंवानें आंखडून जातात तो तेथें जरा येऊन त्यांचे शरीरास तोडूं लागते. पुढें शस्त्रधारेप्रमाणें कठीण मार्ग पर्वतांतून आहे तेथें एकास चढवितात व एकास उतरवितात. तेव्हां ते प्राणी हाहाभूत होतात, पण तेथ कोणी निवारणकर्ता नाहीं. ज्वाळा, वृश्चिक आणि कंटक असून धूम्रयुक्त अग्निमार्गानें ते अंतक पातकीलोकास बांधून आणितात

जो धर्मावांचून जिवंत राहिला आणि कृत्याकृत्य विचार न करून दुष्टमार्गी प्रवर्तक झाला, त्यास पुढील दुःख सोस-वणार नाहीं आणि सर्वदा पाप करून जे धर्ममर्यादा उल्लं-घन करितात;अशा दोषियांस त्या मार्गानें थोर आपदा होते. ते अक्राळविक्राळ अतिअद्भुत आणि भयानक यमदूत दीर्घ शृंखळांनीं पापियाचा दंड आणि गळा बांधून वर लोहार्ग-ळानें मारीत त्यास त्या विशाळ घोर मार्गानें आणितात. त्यांना मुद्गलानें ताडीत असतां कोणी धाकानें भूमावर पडतात व कोणी तें अनिवार दुःख सहन होत नाहीं म्हणून महाशंख करितात ते शोकदुःखानें धरणीवर मूर्छित पडले असतां, त्यांस पुनः उठवून ते भयंकर यमकिंकर तीक्ष्ण प्रहारांनीं ताडितात ग्रीवा, बाहु आणि पृष्टि असे पिच्छाडीं पृ

खळांनीं बांधून वर लोहदंडानें उदंड ठोकीत प्राण्यास त्या मार्गानें आणितात. ती थोर यमजाचणी ' नासिकेत ' म्हणतो मी डोळ्यांनीं पाहिली.

असे कोट्यावधि पापी पुरुषांस ते क्रूरवदनी, भयानक, अतिदारुण आणि निर्दय दूत त्यांचे गळे काळपाशांनीं व हात शृंखळांनीं माघारे बांधून त्यांस ताडितात, व नानाप्रकारें अद्भुत पीडा देतात. ती अशी कीं, त्यांच्या डोळ्यांस काळे नाग झोंबवून, जिव्हेस महाभुजंग डसवितात आणि सर्वांगास व्याळ, वृश्चिकें व्यापून पापी शृंखळा व बाहु पृष्ठी असून मुद्गलानें मारितात. तें दुःख बोलतांयेत नाहीं.

जे कोणी दयाहीन, शठ, नष्ट, दुर्जन आणि वेदवचन अमान्य करून पाखंडी वर्तन करतात. त्यांस ते काळकृतांताचे अवतार यमदूत कठोर हृदयानें लगुडी, पाश, मुद्गल, अर्गळ, फरश, पट्टीश, मुसळ, काठ्या, कटारा आणि त्रिशूळ अशा दुर्धर शस्त्रांचा बिकट मारा देतात. तेव्हां हांका बोंबांचा महागजर होऊन प्राणी अति जर्जर होतसाता रक्ताचा पूर वाहूं लागतो. त्यावेळीं ते प्राणी क्लेशाभिभूत हीन दीन आणि भयानें कंपित होऊन दीर्घस्वरानें रडतात. पण तेथें त्यांना कोण सोडवितो ? वित्त, सुत, कांता हीं दूर राहून तेथें धर्मापरता कोणी सोडविणारा नाहीं. आत्मा परमात्मा एक आहे. असें शास्त्रमुखानें जाणून जे मूर्ख भजन करीत नाहींत, त्यांस ते दूत त्या मार्गानें आणितात. त्यांना अर्धक्षणाचा विसावा

न देतां दूत अनिवार जाचणी करितात, त्यामुळें ते करुणा-वदनानें रडतात. असे कोट्यावधि प्राणी त्या मार्गानें आणितांना मीं पाहिले. यासाठीं मनुष्यजन्मांत येऊन धर्मज्ञानाची सार्थकता करून ज्ञानानें निजधर्म जोडावा. तो अंतकाळीं सोडविणारा आहे.

आतां जे कोणी अधर्मी अज्ञानी,. अन्यायी, अविद्वान्, सुवर्णस्तेयी, धर्माधर्म ज्ञान रहित, मलिन, सत्यशौचविवर्जित अभक्त, आळशी, सदा कुत्सित आणि नित्य कलहकारी आहेत त्यांना त्या घोर मार्गानें आणितांना अतिश्रांत दीनवदनीं अनिवार क्षुधा लागून पाणी पाणी करितात, करुणा भाकितात व त्यांना ग्लानि येते, पण त्या किंकरांना त्यांची दया येत नाहीं. असे असंख्य प्राणी येतांना म्यां देखिले. ते काकुळतीस येऊन त्यांच्या पायांस लागतात, पण ते दूत तसेच मुद्गलघायानें मारितात आणि सांगतात कीं, - आतां काय उपयोग ? पूर्वींच ठाऊक नव्हतें ? अरे मूढा पापिया ! दुर्लभ कर्मभूमीची व नरदेहाची दैवगतीनें प्राप्ति होऊन सारें आयुष्य अधर्मपणें दडविलेंस. चौऱ्यांशींलक्ष योनि हिंडून अवचित मनुष्यजन्म मिळाला असतां तूं धर्माधर्मविचार केला नाहींस ! भवभ्रांतीनें बद्ध होऊन पापासक्त झालास, म्हणून केलें कर्म भोगतोस ! आतां व्यर्थ काकुळतीस कशाला येतोस ? तूं एखादें सुलभ दान सुद्धां केलें नसून पाणी, तृण अथवा

इंधनही दिलें नाहींस. नाहीं केलेंस स्नान, नाहीं केलीस संध्या, नाहीं केलेंस तीर्थास गमन आणि नाहीं पूजिले देवब्राह्मण, अकारण जन्म घालविला. आतां तूं ह्या घोर नरकयातना कशा निस्तरशील ? हें दारुण यमपुरीचें वर्तमान तुला पूर्वी माहित नव्हतें काय ? तूं शिश्नोदरपरायण होऊन स्वहित केलें नाहींस.

जे पापात्मे विषयवासनेत मग्न असून नानाकर्मे करितात व कामलोभाच्या आशेनें वरकड महादोषांस ते पात्र होतात; म्हणून दुःख दुर्दशा भोगितात. ब्राह्मणास चंद्रसूर्य ग्रहणीं, पर्वकाळीं हिरण्यदान, गोदान केलें नसून, नाहीं केलें तप, नाहीं केला जप, आणि सत्यसंकल्प त्यागून पापाचरण केलेंस. शिवाय परमेश्वरीं प्रीति नसून अग्निमुखीं हवन केलें नाहीं. तरी आतां हा दारुण नरकार्णव कसा तराल ? यमपुरीची दारुण जाचणी कधीं ऐकिली नव्हतीस काय ? ' धर्मराजाची ' आज्ञा प्रमाण असून तेथें कोण विचारूं शकेल व ह्या दारुण यातना कशा चुकतील ? कधीं श्रीगुरूचें भजन केलें नसून वृद्धांचीं वचनें मानिलीं नाहींत आणि अज्ञान देहमदानें मूढ होऊन घोर पतनास कारण केलें. मानसीं गर्व ताठा धरून स्वैरें अधर्मवाटा पाडिल्या.

असें म्हणून ते यमदूत त्यांना घोर मार्गानें त्वरित आणितात. जे स्वधर्म विसरून सर्वस्वें पापास वश झाले, तसेच

सुरापानी, स्वामिद्रोही, दुर्बुद्धी, बाळ आणि स्त्री हत्यारी यांना त्या पंथानें आणितात. शिवाय परधन परवनिता यांचा पूर्ण अभिलाषी त्या घोर पंथानें नेतांना नासिकेत म्हणतो मी पाहिला. तसेंच परद्रोही परापवादी, शास्त्रमर्यादा, निंद्य, दयाहीन, दुष्टबुद्धी, दुरात्मा, क्षत्रवृत्ति व गृहहारी, पार्थीकर्म करणारा, मद्यव्यसनी, मांसाहारी, ब्राह्मणजन्मास येऊन मद्यपान करणारा, बाळघातकी, दुराचारी आणि विषप्रयोग करणारा, तसाच आपला वृद्धाचार सोडून नीशाचरीं रतला, असा जो अधर्मी तो सत्यशौचविवर्जित असे बहुत पातकीयांस ते यमदूत त्या घोर शायशीं हजार योजन मार्गानें बांधून आणितात. अशा प्रकारें तेथें अनिवार जाचणी असून कोणी रक्षणकर्ता नाहीं. तें न जाणून प्राणी दुष्टकर्माचरण करून महापतन भोगितात. अशी ही परम पावन धर्मकथा ' नासिकेतानें ' समस्त ऋषिमंडळीस सांगितली.

# अध्याय १८ वा.

## ( दुर्गम अष्टस्थानें व वैतरणी. )

असें ऐकून समस्त ऋषि ' नासिकेताप्रत ' विचारूं लागले कीं, पुढें घोर पंथ कशा रीतीनें पाहिलास आणि दारुण मार्गाचें किती योजनें प्रमाण असून कोणत्या पुण्यानें धार्मिक

तरतात तें संपूर्ण सांग. तेव्हां महामुनि सांगूं लागला कीं, या संसारांत सर्वांपेक्षां मृत्यु अनिवार असून तो प्राण्यास प्रेमपुरीस नेतो; जें जें दृश्य जगडंबर तें तें नाशिवंत जाणावें मृत्युमुखांत पडणार ह्मणून प्रथमच स्वहिताचा विचार करावा तो यमपंथ तरण्यास निधडे एक भगवद्भक्त असून त्यांच्या संगतीनें भाविक तरतात. तेथें स्वजन बांधव आणि आप्त हे कोणीही येत नसून तो दारुण मार्ग तरावयास आपल्या धर्मासच अनुष्ठावें. कारण माता, पिता, बंधु, चुलता सुत, कांता, इष्ट, मित्र, भगिनी, दुहिता, मेहुणे, मातल, धन कनक मान, सन्मान, गाई, ह्मशी, द्रव्य, सुवर्ण, दासदासी आणि सकळ सैन्य असतां एकटाच मरण पावतो. बाकीचें सर्व तेथें विमुख होतें. करितां सर्व परिवार त्यजून यथायुक्त पुण्य आचरावें. या सकळ परिवारादेखत यमकिंकर प्राण्यास बांधून नेतात व महाघोर दुःखयातना भोगवितात

आतां सत्यसुकृती जे मानव आहेत त्यांना धर्मराजाची अशी आज्ञा आहे कीं, पुण्यस्थळीं वैभव भोगा. आतां यममार्गाची निर्गती ऐका. तेथें अतिसंकीर्ण महापर्वत असून तो प्रकाशानें पूर्ण हेलावत आहे. त्याचा पूर्ण प्रकाश नगरावर पडला असून तो अग्नितेजानें परम प्रकाशक आहे. तेथें नाना देवस्थानें अतिरमणीय शोभायमान धार्मिकांकरितां निर्मिली असून त्यांना तेथें विसावा देतात आणि पापिष्ठांस भयंकर

व अतिदुर्धर प्रवस्थानें असून अनिवार यातना होतात आणि धार्मिकांस तेथें अपार सुख होतें; अशा रीतीनें पापपुण्यासी योजून भोग भोगवितात तें म्यां देखिलें.

तेथें पापात्मा यास प्रेतपण आणि धर्मात्मा यास परमस्थान प्राप्त होतें अशी योजना आहे. ती धर्मराजपुरी अति रम्य असून तेथें असें नवल आहे कीं, दोन्हीं स्थानें तिच्यांत आहेत! ती सांगतों ऐका पातकी घोरस्थानीं राहून पुण्यस्थळीं नारदादिमुनी धर्मप्रसादानें सर्व सौख्ययुक्त सिंहासनीं विराजमान आहेत. तेथें पातकीयास दुर्गति असून घोर महादुःखावर्ती सर्वकाळ क्लेशी होतात आणि जो गो, भू, रत्न, हिरण्य, अश्व, रथ, हस्ति, भोजन आणि प्रावरण अशीं दानें देतात ते त्याच मार्गानें सुखानें येतात. जे कर्मभूमीवर कांहीं दान देतात, ते त्या ठिकाणीं उपतिष्ठतात. आतां तेथें जीं दुर्गम अघस्थानें आहेत तीं ऐका. तो मार्ग एक हजार योजनांचा असून फार कठीण आहे. तेथें संपूर्ण पातक्यांना महापीडा होते, तें वन विशाळ असून मार्गांत कांटे फार आहेत. सर्वभर अग्नि दाटलेली व तप्त वाळवेंतून मस्तकापर्यंत अग्नीच्या ज्वाळा निघतात, जे उपानह व छत्रें दान देतात, तेच त्या मार्गानें सुखानें येतात, इतरांस दुर्गम गति असून त्या दुर्गम-मार्गी ते पापी जाऊं शकत नाहींत. त्याच्यापुढें दहाहजार योजनांचा तरवारीच्या धारेसारखा तीक्ष्ण

मार्ग आहे, तो नर शय्यादानानें तरतात. तेथून पुढें अति-दारुण मार्ग लागून, तेथें जळस्तंभ देदीप्यमान आहेत. तेणें दशदिशा आणि गगन व्यापिल्यामुळें तेथें गमन शक्य नाहीं. करितां जे धार्मिक वापी, कूप बांधितात व देवार्चन करितात ते त्या मार्गानें सुखानें येतात. तेथून पुढें चौदा योजनें पर्यंत उष्ण व घोर महास्थान असून परम दारुण अंधःकार आहे, त्यास काळरात्र ह्मणतात. तें, जे देवालयीं दीप लावितात, ते सुखानें तरतात आणि जे धर्मनीति शास्त्राधारें वर्ततात, ते धार्मिक सुखानें पावतात. तेथून पुढें महाक्रूर व अतिघोर कृष्णमेघांचा अंधःकार, महापर्जन्य आणि घोर मेघांची गर्जना, तेथें तरावयास जे अश्वदान, रथदान देतात, ते सुखानें पावतात तेथून पुढें आठ हजार योजनें अतिघोर जलार्णव असून तो मार्ग चालण्यास अति दुस्तर आहे. तेथें नर भूमिदानानेंच तरतात. तेथून पुढें पांच हजार योजनें अतिघोर दुःखदायक मार्ग आहे. तेथें तापलेली वाळू ( जसे अंगार ) असून त्यांतून प्राणी पार पडत नाहीत तेथें त्यांना भारी क्लेश होऊन ते यमदूत मारामारी करितात तेथें धर्माधिकारी व विविध दानें करितात तेच पार पावतात. शिवाय जी कांणी अंधतम त्यास निर्गम नसून घोर जाचणी आहे, तो मार्ग तारण्यास दानानेंच प्राणी समर्थ होतो. असा तो घोरांदर मार्ग नाना दानेंकरून प्राणी तरतात. इत-

त्यांतून पार पडला तरी पुढें ' वैतरणी ' नामक मोठी दुस्तर नदी आहे. जी त्रिभुवनांत अतिविख्यात, जिचें तिचें वेद पुराणें वर्णन करितात; तें, समस्त मुनिहो ! सविस्तर ऐका.

ती शंभर योजनें विस्तीर्ण असून, महापाप्र, बीभत्स, सूर्य-शोणितानें पूर्ण भरलेली आहे तेथें प्राण्यास निर्गम नसून तिच्यामध्यें कीटक व भयानक सर्प आहेत ती दुर्गम असून मोठी अटक होय आणि सर्वांस दुःखदायक आहे. तरी विशेषेंकरून पाप्यांस तेथें अनिवार पीडा होते आजपर्यंत तिच्यामध्यें बुडाले त्यांची गणतीही नाहीं. तेथें तरावयास साधन जे कृष्णधेनु दान देतात. ते तिचें पुच्छ धरून पार पडतात. ज्यांना तीर्थाटन व गंगासागरसंगमीं स्नान घडलें व जे धर्म-शास्त्रांत प्रवीण, त्यांचें आगमन पैलतीरास सहज होतें. जे दृढव्रताचे विश्वासी असून नित्य मनांत धर्म पाळितात. असे सहस्रावधि पुण्यपुरुष धेनूचें पुच्छ धरून क्षणांत परतीरास जातात त्यांना संकट मुळींच नसून ते रथांत देवरूपदेही आरोहून विचित्र वाद्यगजरानें स्वर्गी येतात आणि पातक्यांचा तेथें प्रवेश न होतां, तो दारुण व दुर्धर मार्ग आणि त्यावर यमदूतांचा त्रास असा कीं, ते मुद्गलानें त्यांना ताडितात. तेथें असंख्यात धडधडीत अग्निकुंडें जळत असून ते दूत पाप्यांना त्यांत उचलून टाकितात. शुभाशुभ किंचित् असलें तरी तें तेथें भोगिलेंच पाहिजे. प्राणी तें न जाणून सर्वदा अपाव

अर्जितात; यासाठीं मनुष्यजन्मांत येऊन धर्म जोडावा, तो अंतकाळीं विषमठायीं जीवास सोडविणारा आहे. धर्म अबंधूंचा बंधु असून धर्म क्षुधितांचा अमृतसिंधु होय. तो पापास निरसून दुःख निवारता आहे. विचारवंतांचा धर्म सांगाती असून त्याच्यानें पुण्य व संपत्ति जोडते आणि धर्माची अशी अगाध ख्याति असून तो तिहीं लोकांस पावन करितो. यासाठीं संसारभयभीतांस धर्मच बंधु व माता पिता असून अंतकाळीं नाना दुरितांपासून सोडविणारा तो होय. जो संसारतापानें पोळून माघारा पळाला, तो स्वधर्मतरूच्या छायेस बसून आनंदानें सोहळे भोगितो. ज्यांचा धर्म पाठिराखा आहे ते कळिकाळास भीत नाहींत, म्हणून अनाथास धर्मासारखा जिवलग दुसरा नाहीं. ज्यांना निजधर्माचें रक्षण आहे, त्यांना भवबंधन मुळींच नसून ते धर्मानें कीर्तिमान् पुण्यपरायण स्थास पावतात.

यासाठीं प्रयत्नेंकरून धर्मकार्याचें संरक्षण करावें. आपल्या धर्माचा अव्हेर केल्यानें, अनिवार पतन भोगावें लागतें, हें पुण्यपावनाचें चरित्र आणि धर्मकीर्तन अतिपवित्र असून तें महापातक्यास पवित्र करितें. त्यास धर्माचें सुक्षेत्र म्हणतात. हें धर्माधर्म विवेचन श्रवणद्वारें जो चित्तांत बाळगितो, तो अधर्मवासना त्यागून निजधर्माचें आचरण करितो! जसें, दिव्याच्या आधारें प्राणी अडखळून पडत नाहींत, तसें.

धर्मशास्त्रानें युक्त मानव अधर्म आचरीत नाहींत. ह्मणून हें पुण्यश्रवण असें आहे की, जसें डोळ्यांत अंजन घातल्यानें पृथ्वीतळींचें निधान दिसतें, तसें प्राणी दैवगतीनें आपणास पाहतो. या शास्त्राधारें जो पुण्यात्मा वर्तन करितो, तो त्रिरुद्रास त्यजून अपार पुण्य पावतो यापमाणें 'नासिकेतानें' यमपुरीचें वर्तमान सांगून, पुण्यावाचून गहन फळ मिळत नाहीं ह्मणून धर्मास साह्य करावें असें सांगितलें.

# अध्याय १९ वा

## ( धर्मराजाच्या दर्शनास नारदमुनि येतो )

आतां ' नासिकेत ' दयाधर्माचा महिमा व धार्मिकांचा सुखदायक,मार्ग सांगूं लागतो. ज्या मार्गानें धार्मिक जातात,तो मार्ग अतिसुखदायक, निर्मळ, कोमळ, निष्कंटक आणि कोठें अटक नाहीं असा असून मार्गानें पावलोपावली निर्मळ उदक व वृक्ष पुष्पफळें यांनीं घमघमीत अति सुस्वाद सुपरिमळ सुटलेला असे आहेत. आणि त्यांवर पुष्कळ जातींचे पक्षी असून कोकिळा पंचमशब्द कुंजतात. कांहीं पक्षी वेदानुवाद करितात. तसेंच शुकसारसांचा पतिसंवाद ऐकून मार्गस्थांस परमानंद होतो. तो मार्ग निर्मळ, कोमल आणि

अतिसुखद असून षट्पद मकरंदी झंपावतात. शिवाय वापी कूप, सरिता आणि तडाग ही संपूर्ण निर्मळ उदकानें भरलेली आहेत. तेथें सिद्ध ऋषि क्रीडारंत करितात. असे अनेक धार्मिक त्या रस्त्यानें जातात ते दिव्यभरणी विमानांतून बसून नाना गीत नृत्य-... ध्वनि अशा समारंभानें स्वर्गभुवनीं येतात आणि त्यांना भक्ष्य भोज्यादिदिव्यान्नें तसेंच दधि. क्षीर. अमृतपान मिळून आरामदायक अति रमणीय स्थान प्राप्त होतें. तेथें जाई-जुई, नागपंचक, देवदारु आणि पारिजातक असे अलौलिक पुष्पयाति असून. सुस्वर त्यांच्या वरती पुष्पवृष्टि करितात. त्यांचें पूर्वपुण्य मोठें गहन व त्यांनीं गो, भू आणि हिरण्यदानें केलीं, त्यामुळें ते पुण्यपरायण तेथें रत्नखचित सिंहासनीं दिव्याभरणीं सालंकृत सुखसंपन्न राहतात. आणि त्यांना लांबीचा मार्ग नसून ते स्वल्पमार्गानें गमन करितात; याप्रमाणें धार्मिकांचा सुखदायक मार्ग ' नासिकेतानें ' ऋषींस निवेदन केला.

दुसरें त्यानें यमपुरींत काय कौतुक पाहिलें तें ऐका-सकळ ' धर्मसभा ' देदीप्यमान विराजित असून तीमध्यें चंद्राप्रमाणें ' धर्मराजा ' शोभत आहे व त्याच्या अगाध महिम्यास उपमा नसून तेथें सिद्ध, ऋषि आणि तपोधन बसले आहेत अशा त्या सभेमध्यें ' नारदाचें ' आगमन झालें; तेव्हां तो ' नारदमुनी ' रामनामाच्या भजनांत आनंदभरित होऊन

ब्रह्मवीणा वाजवीत मोठ्या प्रेमानंदानें सभेंत आला. त्यास पाहून 'धर्मराजानें' सत्वर उठून साष्टांग प्रणिपात केला आणि त्या मुनिश्रेष्ठास दिव्यासनीं बसवून अर्ध्यपाद्यादि पूजन करून यथोक्त भोजन दिलें व हात जोडून विनंति केली की. महाराज ' आज आपलें दुर्लभ दर्शन देऊन आपण मजला संपूर्ण सनाथ केलें. माझा जन्म आणि क्रियाकर्में आज संतांचे उत्तम दर्शनें करून सफळ झालीं. असें ऐकून तो ब्रह्मसुत ( नारदमुनि ) संतोष पावून ह्मणालाः—हे 'धर्मराजा' तुला परमेश्वरानें ज्या कामाकरितां ठेविलें आहे, त्याचा धर्माधर्म विचार करून प्रजेस नेम लावावा, त्रिजगतांस निर्मिता असा यमदंड तुझ्या हातांत असून धर्मनिर्णय कशा रीतीनें पहातांस व धर्म. अर्थ काम आणि मोक्ष हे धार्मिकांस कसे देतांस व दानव, मानव, निशाचर यांचा धर्माधर्म विचार कसा करतांस? वगैरे पाहण्यास मी आलों आहें.

असें 'नारदाचें' भाषण ऐकून 'धर्मराजानें' त्यावेळीं कांहीं विमानें आणविलीं. तीं अत्यंत सुशोभित असून ज्यांत दुंदुभि वगैरे नाना वाद्यांचा गजर, होतोआहे, गंधर्वकुमारी गीतनृत्य करीत आहेत व जीं मुक्ताभरणीं शृंगारिलेलें हत्ती, अश्व आणि रथ तसेंच ध्वजपताका छत्रे यांनीं शोभत आहेत अशा विमानांध्यें 'धर्मराजा' 'नारदादि' मुनिगणांसह बसून वायुवेगानें निघाला. त्यावेळीं स्वर्गांतील अति-

दुर्गम आणि विषम स्थानें व नरक कसकसे आहेत ते व महा पातकी यांचीं दंडणें, तें सर्व वर्तमान त्यांना दाखवूं लागला

तें समस्त अवलोकन करून ' नारद ' विस्मित होऊन यमधर्मास ' बोलता झाला कीं, हे वैवस्वता ! तूं विष्णुतुल्य-प्रतापी असून त्रैलोक्यदंडन तुझ्या हातांत असल्यामुळ सर्वांचा शास्ता तूंच आहेस, व धर्माधर्माचा विचार करण्या-स्तव ' नारायणानें ' तुला स्थापन केलें आहे आणि मी तुझ्या दर्शनास आलों आहें; तरी मला धर्मविचाराची प्रत्युक्ति सांग. कोणत्या कर्मास कशी गति मिळते तें संपूर्ण ऐकण्याची माझी इच्छा आहे.

त्यावेळीं यमधर्म ' सांगूं लागला कीं, मला वेदाज्ञा प्रमाण असून मी तिचाच विचार करितों. जे नारायणाची आज्ञा व वेदवचनांस अमान्य करितात, त्यांस नाना प्रकारें दंडून सत्यधर्मास लावावयाचें. तसेंच परमेश्वराची आज्ञा प्रमाण मानून जे जन पुण्याचरण करितात, ते येथें उत्तम फल भोगितात. मला श्रीहरीनें येथें ठेविलें आहे, तरी त्याची आज्ञा जीं वेदवचनें आहेत, त्याच्याप्रमाणें न्यायान्याय निवडून प्राण्याकडून संचित भोगवितों. प्राणी जें कर्मभूमीस संचित करितात, तें येथें भोगितात. त्यास वेदाज्ञा समर्थ असून मी फक्त श्रीहरीचा स्थापित आहें.

असें बोलून तो ' धर्मराजा ' नारदादिकांसहवर्तमान आ-

पल्या सभत परत आला. सभेंत सुर, नर, गंधर्व, यक्ष, किन्नर आणि नारदादि सर्व ऋषिगण बसले असतां ' धर्मराजा ' सिंहासनीं बालादित्याप्रमाणें शोभूं लागला व त्यानें दूतास पाचारण करून काय आज्ञा केली ती ऐका. दूतहो! तुह्मी मृत्युलोकीं फिरत असतां. वैष्णवांचा त्याग करून अभक्त, अनाचारी यांस बांधून यमपुरींत आणावें आणि सर्वतोपरी भक्तजनांस वर्जावें. ती ' धर्मराजाची ' आज्ञा शिरसा मान्य करून व हात जोडून किंकरांनीं उत्तर केलें कीं, महाराज! विष्णुभक्त कसे व त्यांची लक्षणें कोणतीं आणि आह्मीं त्यांस कसें जाणावें? तसेंच अभक्त कोणते व त्यांचीं लक्षणें काय तें संपूर्ण सांगावें

तव्हा ' धर्मराजा ' सांगूं लागला कीं, ज्यांच्या घरांत पतिव्रता स्त्री असून सर्वथा सत्यानें व धर्मानें चालतात, यथाशक्ति नित्यदान देतात, अतिथीचें पूजन करून मुखानें नामसंकीर्तन करितात; ते वैष्णव जाणून त्यांना वर्जावें. तसेंच ज्यांच्या घरीं कपिला धेनु चांगल्या प्रकारें पाळिली ते, जे गृहाभीतरीं यथोचित गोमयानें संमार्जन करितात आणि हृदयांतरीं विष्णु, हरि गोपाळ या नामांची जपमाळ धारण करितात त्यांना तुह्मीं त्यागावें. तसेंच जे आपल्या श्रद्धाभक्तीनें भिंतीवर अवतारचित्रें लिहितात व सावधपणें द्वारावतीस चक्राचें पूजन करून शालिग्रामाचें सर्वदा अर्चन करि-

तात. अशा हरिभक्तांस वैष्णव जाणावें. त्याच जवळ तुमचा निभाव लागणार नाहीं. ते वैष्णव सतत एकांतीं जप करितात, व सर्वांगीं हरिचंदन व गोपीचंदन चर्चितात आणि वाद्यें करून रसाळ हरिकथा गातात शिवाय तुळशीकाष्ठांच्या माळा घालून शंखचक्रांच्या मुद्रा धारण करितात. तेणेंकरून ते हरिभक्त शोभतात, अशा लक्षणांनीं युक्त त्यांना पृथ्वीवर पहाल त्यांना तुम्ही नमीत जा. शिवाय सकळ तीर्थांचें जें तीर्थ असें श्रीहरिचरणाचें तीर्थ जे प्राशन करितात व ज्यांना हरिप्रसादाची गोडी असून निर्माल्याचें अवघ्राण घडतें, त्यांचे येथें तुम्हीं जाऊं नये. तसेंच ज्यांना नर्मदा गंगास्नान घडतें, व ज्यांनीं गोमतीतीरीं षण्मास वास केला, आणि देवादिकांस दुर्लभ असें जें केदाराचें महिमान. तेथील जळ जो प्राशन करितो त्यास तुम्हीं वर्जावें; शिवाय जेथें अग्निहोत्र; वैश्वदेव नित्य होम असून षट्कर्मी वेदविहित आणि यथोक्त आचार आचरण करणारा ब्राह्मण, त्याचे येथें तुम्हीं जाऊं नये, ऋषिहो! आणखीही त्यांचीं चिन्हें यमधर्मानें दूतास सांगितलीं तीं ऐका. जेथें हरिकीर्तन, टाळमृदंगांचा गजर आणि गरुड टक्यांचे संभार पहाल, तेथून तुम्हीं सत्वर पळावें. व जो तुळसीपत्र मस्तकीं धारण करून श्रीकृष्णनामाचा गजर करितो, व निरंतर श्रीहरीचे ठायीं प्रीति ठेवितो आणि कृष्ण हरि गोपाळ या नांवांची जपमाळा हृदयीं धारण करितो, अशा

ण्यास तुम्ही त्यागावें. शिवाय स्तवराज, मनुस्मृति, गीता, जेंद्रमोक्ष आणि सहस्रनाम यांचीं जे नियमानें पारायणें रितात व अश्वत्थ धात्री आणि बिल्व हे वृक्ष जेथें असेल तेथें तुम्हीं जाऊं नये; केवळ तुळशीचें जें मूळ विस्तारलें सकळ तीर्थ जाणावें आणि त्याच्या शाखा ते देव व पत्रें ीं वेद आहेत. अशा प्रकारें तुळशी जवळ नारायण असल्याळें वृंदावन हें विष्णुभुवन होय. करितां तुम्हीं तेथें जाऊं नये. स्थान तुम्हांस अगम्य आहे

आतां ज्यांच्या श्रवणीं, कंठीं मुकुटास आणि हातात द्राक्षांचें भूषण आहे, त्यांचें आयुष्य वर्धमान होऊन ते रमपदा जातात आणि जे शिव अथवा केशवाचें स्मरण रितात, व मंत्रानें विभूति धारण करितात, अशा महानुभावांा नांव तुम्हीं घेऊं नका. शिवाय मंत्रानें विभूति धारण, दाशिव नामाचें स्मरण आणि नित्य लिंगार्चन जे करितात थें जाऊं नका. अशीं भगवद्भक्तांचीं लक्षणें धर्मराजानें सांगून गणस्वी असें आज्ञापिलें कीं, ज्याचे मुखीं हरिनाम असून ृदयीं हरिप्रेम आहे व ज्याचे सकळ मनोधर्म सत्य सर्वोत्तमजनीं अर्पण झाले, त्यास कधीं भवबंधन नाहीं. करितां ीं जीं हरिभक्तांचीं चिन्हें सांगितलीं तेथें तुम्हीं कधींही ाऊं नये.

---

# अध्याय २० वा

## ( यमधर्माचा दूतांस उपदेश )

त्यावेळीं किंकरांनीं हात जोडून ' धर्मराजास ' विनंति केली कीं, आपण वैष्णवांचीं लक्षणें सांगितलीं तीं संपूर्ण आह्मीं समजलों; पण आतां अभक्त अनाचारी कसे व त्यांचीं लक्षणें कशीं, ती, संपूर्ण सांगावीं तेव्हां ' धर्मराजा ' ह्मणाला कीं–ऐका· जे महापातकी उग्रकर्मांत रत झाले व नेहमीं असत्य भाषण करणारे, ज्यांची ईश्वरभजनी श्रद्धा नाहीं व जे वेदमर्यादा उल्लंघन करितात,त्यांची तुह्मी आपदा करा जो मत्सरी असून मार्गामार्ग जाणत नाहीं व ब्रह्मद्वेष करितो व वेदप्रतिपाद्य जे ब्राह्मण त्यांची स्वमुखानें निंदा करून जो सर्वदा क्रूरकर्मी वर्ततो व भलत्याच वादास प्रवर्तक होतो त्यास तुह्मीं दंडावें· जो पातकीयांत शिरोमणी, तसाच ब्राह्मणपत्नीस भोगणारा शूद्र, यांना जळतयोनींत हिंडवून अनिवार जाचणी करावी· तसेंच सात्विक, सज्जन आणि संन्यासी यांचा द्वेष अथवा उपहास करणारास अवश्य पतनास नेऊन टाका व अमित जीवांची हिंसा करणारा सुरापानी दुराचारी यांस नाना प्रकारें करून अवश्य दंडा व सुवर्णचोरी करणारा, परद्रव्य, परनारी, अभिलाषी, जो स्वतः करतो आशा पातकीयास चिरकाल अघोर पतनीं घाला.

अशी माझी तुह्मांस आज्ञा आहे. सद्गुरुची पत्नी ती शिष्यांस केवळ जननी असून तिचा जो मनांत अभिलाष धारण करितो त्यास बांधून आणा. जो घोडे विकून पोट भरितो व कन्याविक्रय करतो, तसाच विश्वासघातकी, दुराचारी यास नाना प्रकारें दंडावा. माता पिता हीं केवळ तीर्थे असतां, त्यांचा जो दुष्ट त्याग करितो, त्यास दक्षिणद्वारानें आणावा. तसाच श्रीगुरु केवळ ईश्वर असून त्याचा नाममंत्र अभ्यासून त्या मंत्राचा जो त्याग करितो. त्या अपवित्रास अघोर मार्गानें जलद आणावा. अनाश्रित भगिनीचा व वार्धक्यपणीं ज्येष्ठबंधूचा जो त्याग करतो त्या नीचास जळस्तंभाशीं घट्ट बांधावा. शिवाय कुलस्त्रीचा त्याग करून शिष्यसंप्रदायानें परस्त्री वरितो व शाबरीमंत्राचा उपदेश करतो तो दुराचारी तुह्मी आणावा

शिवाय आणखी पापियांचीं लक्षणें ऐका. जो गुरूची आज्ञा मानीत नाहीं, गांवांत कीर्तन असतां घरांत निजून राहतो, विष्णुव्रत एकादशी करीत नाहीं, शेजारीं सज्जनसंगती असून त्यांचा नानाप्रकारें द्वेष करतो अशा दुर्जनास यमदंडानें प्रहार करावा. तसाच ब्राह्मणजन्म प्राप्त होऊन जो अनाचारी वर्ततो आणि शूद्रस्त्रीस घरांत ठेवितो, तो क्षत्रिय अथवा वैश्य असो त्यास असिपत्रानें दंडावा. आतां शठ, नष्ट, दांभिक, मांसाहारी, सुरापानी, पारधी करणारा, वेश्यागमनी,

पाखांडवादी, मिथ्याज्ञानी. अमंत्रवादी. कामुक आणि दुःख-दायक असे अनेकानेक पापी असून शिवाय गुरुदीक्षा ज्याला नाहीं, व साधकास आचाराच्या मिषानें भ्रष्टविणारा, आ-पण नीचयोनि, अनाचारी असून ब्राह्मणस्त्री घरांत ठेविता व मनास येईल तसें कर्म करतांना ज्यास कंटाळा येत नाहीं. व मद्यपान सर्वदा करून वेदांची मर्यादा उल्लंधितो. व की-र्तनाचा द्वेष आणि निंदा करून धर्मवार्ता कधीं जाणत नाहीं. व जो गुरुदीक्षा जवळ नसून रुद्राक्ष व तुळसीच्या माळा गळ्यांत घालितो तो महादोषी होय. त्यास शृंखळांनीं बांधून आणा. तसेंच ज्यास भूतदया मुळींच नसून जो पापलोभानें अंतर्दोषी. अशुद्ध आणि मलिनमनाचा तोही नरकीं आ-णावा. शिवाय ज्याचें जीवित स्त्रीआधीन असून जो देव-तीर्थ जाणत नाहीं व गुरूस क्षुद्र मानितो तो मूर्तिमंत दो-षाढ्य होय. अशा लक्षणांनीं जो युक्त दिसेल त्यास अनिवार जाचणी करून पतनीं घाला.

अशा प्रकारें अभक्तांचीं लक्षणें धर्मराजानें ' दूतांस सां-गितलीं कारण भक्तांचीं चिन्हें जाणावयास. मग ती ' प्रेतनाथाची ' आज्ञा दूतांनीं मस्तकीं वंदन करून त्यास प्रणिपात केला आणि हात जोडून प्रश्न करिते झाले कीं, आह्मी पृथ्वीवर हिंडत असतां, कोठें रहावें ? तें ऐकून यमधर्मानें ' सांगितलें कीं जी स्त्री मोकळ्या के-

शानीं राहते, रात्रंदिवस कलह करते, माथा उघडा टाकिते आणि उठतां बसतां श्वास घालिते तिचे घरीं तुह्मीं विश्रांति घ्यावी. ज्या घरीं सदा संमार्जन नसून अंगण बुभुक्षित दिसतें व तुळसीवृंदावन नाहीं, त्या घरीं तुह्मीं रहावें. जी रांधितांना अन्न खाते आणि भग्नपात्रीं भोजन करिते, असें जें जें कुत्सित स्थान दिसेल तेथें तुह्मीं सुखानें रहावें. आणखी जी रजस्वला स्त्री खाटेवर निद्रा करिते, तिचे घरीं तुह्मीं विश्रांति घ्यावी. शिवाय तुह्मीं कांटे, बोरट्या, पांजरी, दीपसावलींत आणि केराच्या उकिडर्यावर सुखें करून असावें. तसेंच पुरुष असो अथवा स्त्री असो, जे आखंड उंबऱ्यावर बसतात व ज्यांचे घरीं अग्नि नाहीं तेथें तुह्मीं निरंतर रहा. शिवाय जेथें श्वान मार्जार आणि कुक्कुट यांचें उष्टें पडतें, व जे अहोरात्र कटकट करतात, तेथें तुह्मीं अगदीं निकट बसावें.

आणखी स्थानें सांगतों तीं ऐका. जे घरांत राघु पाळितात व सर्वदा मलिन राहतात आणि हाताच्या अंगळीनें दीप सरसावितात, तेथें तुह्मीं बसावें. ज्या घरांत निळीचीं वस्त्रें आहे व जे दोन्ही हातानें डोकें खाजवितात, आणि ओट्यावर बसून मुततात. तसेंच श्मशानभूमिका, शुष्कवृक्षाचें खोड आणि जेथें विहीर वगैरे कोरडीं असतील असें स्थान मोठ्या आवडीनें तुह्मीं शोधावें, शिवाय जेथें निळीचा कूड पाहाल अथवा ओस गृह, तसेंच मद्याचें भांडें, व जेथें गोचर्म वाळत आहे तेथें सुखानें रहावें.

अशा प्रमाणें स .ॅ' यमधर्म ' दूतांस आज्ञापितो कीं, जेथें भक्ति नाहीं तेथें रहावें. ज्या गांवांत साधु नाहींत तो गांव तुमच्या मिराशीचा आहे असें समजा. हें ज्यांला खरें वाटत नसेल त्यांनीं ' यमगीता ' पहावी.

# अध्याय २१ वा.

## यमधर्मानें नारदास, जनकराजाचें चरित्र व यमपुरीचें पतन चुकविण्यास काय केलें पाहिजे तें संपूर्ण सांगितलें आहे. )

ती यमपुरींची दारुण अवस्था पाहून ' नारदानें ' त्या ' प्रेतनाथास ' अशी विनंति केली कीं, हें दारुण पतन चुकविण्यास काय उपाय आहे तो सांग ? तूं सर्वांत परिपूर्ण आहेस. असें त्या मुनीचें भाषण ऐकून ' यमधर्म ' सांगता झाला. ती कथा ' नासिकेत ' समस्त ऋषींस सांगतो. कोणत्या पुण्येंकरून हें दारुण पतन निरसून दोषाची निष्कृति होते, या ' नारदाच्या ' प्रश्नास यमानें असें उत्तर दिलें कीं, सर्वजन धर्मानेंच तरून स्वर्गास जातात. आतां त्या धर्माचेंच आख्यान संपूर्ण सांगतों व तेणेंकरून महापातकाचे निर्दलन होऊन प्राणी त्रिजगतीं पावन होतात.

पूर्वी त्रेतायुगाचे ठायीं स्वधर्मस्थित आणि सात्विक असा जनक राजा ' होऊन गेला; त्याची पवित्र कीर्ति ऐका. तो गोब्राम्हणांचा परमभक्त असून दाता, दयाळू, कृपावंत आणि धर्मनीतीनें आचरण करणारा, भगवद्भक्तिपरायण असा होता. तो नित्यनेम, जपानुष्ठान, अश्वमेधादि यज्ञ, अहर्निशी अतिथिपूजन करून पुत्राप्रमाणें प्रजेचें पालन करीत असे. त्याच्या राज्यांत सर्व लोक भगवद्भक्त असून कोणास दैन्य व दुर्भिक्ष नव्हतें. त्यामुळें समस्त प्रजा सुखानें वर्तत असे आणि गाई बहुत दूध देत. सदा वृक्षवल्लीस फळें असावयाचीं, व सर्व लोक समाधानस्थित, स्वधर्मयुक्त आणि सात्विक असे असत.

याप्रमाणें तो राजा भूतदयाळू, भजनशील आणि सकलशास्त्रपारंगत असून त्याची त्रैलोक्यांत मोठी कीर्ति होती. त्याच्या राज्यांत समस्त लोक चिरायु असून कोणास जरा वार्धक्य नव्हतें. तो ' जनक राजा ' जितेंद्रिय, दृढव्रत, पुण्यवंत आणि प्रजापालनीं दक्ष असा होता. त्याची भार्या ' सत्यवती ' नामें महापतिव्रता होती. ती संपूर्ण लक्षणांनीं युक्त असून सर्वालंकारांनीं मंडित, सर्वाभरणीं युक्त, सुखसंपन्न आणि पतिव्रतांत शिरोमणी अशी होती. तिनें कायावाचामनेंकरून आपला प्राण पतिसेवेशीं विकिला होता आणि आपण सर्वदा पतीच्या वचनाधीन असे पतिच आपलें दैवत असून तोच

आपला भर्ता असें ती मानीत असल्यामुळें ती त्याच्याशीं भि-न्नभावानें मुळींच वागत नसे. ती पतिसेवेंत निरंतर मग्न असे आणि ती पतिदुःखानें दुःखी होई. पतीला सुखी पाहतांच तिला समाधान वाटे. तिनें मोठ्या नम्रतेनें नित्यशः ब्राह्मणांचें पूजन करावें; शिवाय नित्य देवतार्चन. गौरीपूजन, गंगास्नान आणि अतीतास इच्छाभोजन देऊन त्याचें सद्भावें पूजन करावें. आणि ती सर्वांभूतीं दयायुक्त असून पतीला प्राणांपेक्षां जास्त मानीत असे. अशी ती परम विख्यात पतिव्रता तिनें आपलें आश्रमीं धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष स्वधर्मानें साधून ती आपल्या स्वेच्छेनें पुष्पकविमानांत बसून अमरावतीस येती झाली.

तेव्हां स्वर्गीं तिचें आगमन पाहून तीस महाऋषि गंधर्व आणि सुरवर सामोरे येऊन, त्यांनीं तिचें दिव्य स्तोत्रांनीं स्तवन केलें. त्यावेळीं ' यमधर्म ' नारदास ह्मणाला—हे मु-निवर्या ! ह्यांच्या धर्मानें आह्मांस पवित्रता येऊन ह्यांच्या दर्शनानें आमचीं पापें भस्म होतात. जे विमानांत बसून स्वर्गभुवनीं क्रीडा करितात, ते वैकुंठवासी असोत अथवा शिवभुवनीं ह्मणजे कैलासवासी असोत. त्यांची देवगण सन्मानानें पूजा करितात व ते सर्वांस वंद्य होतात. त्यांना देव प्रणिपात करून त्यांचा जयजयकार करितात. गीत नृत्य व विचित्र वाद्यांचा गजर करितात व सर्व आनंदभरित होतात. अशी स्वधर्माची ख्याति आहे.

पतिव्रता आपल्या पतीसह स्वर्गभुवन क्रमून ब्रह्मभुवनापर्यंत दिव्यदेहें विराजमान होतात. त्यांच्या सेवेंत सुर, नर, किन्नर, विद्याधर, गंधर्व आणि नाग हे अतितत्पर असतात. असा त्यांचा अपार महिमा आहे. निजधर्मासाठीं इंद्रादिक सकळ देव त्यांची पूजा करून कौतुकानें महामहोत्सव करितात अशी स्वधर्माचरणाची प्रौढी आहे.

जे विषयांचा त्याग करून आचारनिष्ठ आणि स्वधर्मतत्पर असतात, ते सुखरूप यमपुरीं येतांना त्यांना सुरवर आपला माथा नम्र करितात; ह्मणून जे जितेंद्रिय, जितक्रोध आणि ज्यांना तत्वबोध प्राप्त झाला, ते आपला धर्म शुद्धरीतीनें आचरतात. त्यांस परमपद प्राप्त होतें. ज्यांची सदाचारीं पूर्ण निष्ठा असून जे श्रीगुरुचें अनन्य भजन करितात, त्यांना भवबंधन नसून ते निजकल्याण पावतात. शिवाय ज्यांना विष्णुभक्ति, विष्णुव्रत असून मुखांत नित्य ‘ अच्युत ’ नामाचें स्मरण आहे, त्यांच्या पायांस मोक्ष लागून मी त्यांचेनीं सनाथ आहें. ‘ यमधर्म ’ नारदास ह्मणतो, ते परमपदीं जातात व पाप्यांस आपदा भोगण्यास माझी यमपुरी आहेच. तुह्मीं जो मला प्रश्न केला कीं, यमपुरीचें वर्तमान कसें आहे. तरी स्वधर्मरक्षणास मला नारायणानें ठेविलें आहे. जे नित्य धर्मपरायण असून शिवतत्वीं लीन झाले,

आणखी ‘ धर्मराजा ’ सांगूं लागला कीं—ज्यांचा अती

तभजनीं विश्वास असून ज्यांचे मानसीं भूतकृपा पूर्ण आहे त्यांच्या दासांचाही मी दास आहें. भगवद्भक्तीचा अगाध महिमा असून हरिहरभजनानें कैवल्यप्राप्ति होते, कारण अंतकाळींचा सांगाती निजधर्म होय. प्राणी या भवावर्नी पडला असतां, त्यास धर्म स्वशक्तीनें सोडवितो; हें निश्चित जाणावें. अशाप्रकारें सत्य स्वधर्मयुक्त विष्णुव्रती जो भगवद्भक्त त्याचा मी अंकित असून जे अनन्यभावें नामस्मरण करितात, भगवद्भावानें अतिथिपूजन करितात, तसेच जे गुरुभक्तिपरायण आहेत त्यांना मी शरण आहें त्यांना भवबाधा आणि पराभव नाहीं. जे 'गोविंदास' अनुष्ठितात ते परमपदास योग्य होतात. जे शिवतत्वीं लीन झाले, त्यांस परमस्थान प्राप्त होतें आणि त्यांचे चरण मी मस्तकीं वंदन करितों, 'नारदा' हें सत्य जाणावें. शिवाय जे हरिभजनीं अनुसरतात व अहर्निशीं नामाचा जप करितात, ते कळिकाळास भीत नसून मी त्या संतांस ध्यातों. याप्रमाणें 'यमधर्मानें' यमपुरीचा सप्रेम वृत्तांत सांगून तो 'नारदाच्या' पायांस लागला, तेणेंकरून नारद संतोषित होऊन तो स्वर्गभुवनीं गेला.

याप्रमाणें 'नासिकेतानें' यमपुरीचा सर्व वृत्तांत सांगितला. तो ऐकून त्या समस्त महर्षींनीं, आनंदानें जयजयकार केला. तें महच्चरित्र ऐकून सर्व ऋषि विस्मित झाले आणि त्यांनीं सुखानें 'हरिहर' नामाचा गजर केला. आधींच ते

धामिक असून त्यावर पुण्यश्रद्धा वा.
आणि आचारावर निष्ठा असल्यानें त्यांस अधिक तपावर प्राप्त झाली. करितां स्नान, संध्या, जप आणि होम हीं स्वकर्मं नित्यनेमें आचरिलीं असतां आनंदसिद्ध हा निजधर्म उत्तमोत्तम गति देणारा आहे.

अशी ही धर्मकथा ऐकून ते संपूर्ण ऋषि 'नासिकेताची आज्ञा घेऊन आपापल्या आश्रमीं गेले. आतां 'उद्दालकाच्या तपाची ख्याति व ब्रह्मदेवाच्या वरदानानें त्यास पुत्रप्राप्ति होऊन त्याची कीर्ति तिहींलोकीं सकल वर्णितात. अशी परमपावन कथा जगदुद्धारणास्तव वैशंपायनानें 'जनमेजय' राजास सांगितली. ती ही 'नासिकेताची' कथा पुरातन असून अगाध पुण्यदायक आहे. ही श्रवण केल्यानें प्राण्यांस भवबंध, नरकपतन आणि अकाळीं मरण यांची मुळींच भीति नाहीं. त्यांची कीर्ति वर्धमान होते व ते पुण्यपरायण होतात. शिवाय ते सकळ स्थानें क्रमून सन्मानानें अंतकाळीं अमरावतीस येतात. जे ह्या ग्रंथावर आवड ठेवून श्रद्धेनें वाचितात त्यांस संसारगुंती आणि जरामरणाचें भय नसून ते पावन होतात. हा ग्रंथ सद्गुरुकृपेनें यथामति परोपकारार्थ लिहिला, तरी त्या सद्गुरूचा अगाध महिमा वर्णावयास माझ्यासारख्या पामरास ज्ञान कोठून असणार? ह्मणून मौन धारण करून निजभावानें साष्टांग नमस्कार करितों. या

ग्रंथाच्या श्रवणपठणानें प्राण्यास पापपुण्य कळून तो दोषमुक्त होत्साता, त्यास ग्रह, पिशाच्च आणि रोग यांची बाधा होणार नाहीं आणि जे चांडाळ हें असत्य मानून निंदा करितात. त्यांचा यास विटाळ सुद्धां होऊं नये अशी त्या जगन्नियंत्यास माझी हात जोडून प्रार्थना आहे.




Printed & Published by V. V. Pathak at the
Jagadishwar Press, Girgaon Gaiwadi
House No. 9 Bombay.